# श्रीआदिनाथ जैनमंदिर सोलापुर

# शत-सांवत्सरिक-इतिहास

लेखक:

इतिहास-लेखन समितिचे सदस्य.

---

संपादक व प्रकाशक
श्री पं. वर्धमान पार्श्वनाथ शास्त्री
विद्यावाचस्पति. न्यायकाव्यतीर्थ.
अध्यक्ष—इतिहास प्रकाशन समिति सोलापुर

प्रति ५०० | माग वद्य. ५ सं. २००५ सन् १९४९ | किंमत सवा रुपया

## संपादकीय दोन शब्द

श्री आदिनाथमंदिर शतसांवत्सरिक महोत्सव प्रसंगी शत सांवत्सरिक इतिहास प्रकाशित करणें उचित होईल ही कल्पना समितिचे पुढे आल्यावर समितीने आनंदाने या गोष्टीस मान्यता दिली. परंपरेच्या नियमानुसार इतिहास लेखनाच्या कार्यामध्ये ही अनेक विघ्नें आलीं व गेलीं. तथापि समितिचे सदस्यांचे अदम्य उत्साह आणि निस्पृह सहयोगाने अत्यंत अल्प अवधींत हें कार्य संपन्न झालें आहे. म्हणून त्यामध्ये सपूर्णपरिचय, भाषासौंदर्य येथेष्टसंकलन आणि सर्वजनसंतोषहेतुत्व आदि गुणांचे अभाव असणें शक्य आहे माहिती वेळेवर जेवढी मिळू शकली तेवढी संकलित केली गेली. या शिवाय इतर ज्या धर्मात्म्यांनी या संस्थानच्या श्री वृद्धीकरितां सेवा अर्पण केली आहे ते सर्व धन्यवादार्ह आहेत.

या इतिहासाच्या वाचनाने पाठकांनी पुढील पीढीमध्ये याच प्रमाणें नवीन इतिहास निर्माण होण्या सारखी अनुदिन–प्रवृत्ति ठेवल्यास सर्वांचे श्रम सार्थक होईल.

विनीत—

[signature]

श्री आदिनाथ जैन मंदिर महाद्वार साल्गापुर

## सोलापुर शुक्रवार पेठेंतील
## श्री आदिनाथ दिगंबर जैन–मंदिराचा
# शत-सांवत्सरिक-महोत्सव

श्रीमते सकलज्ञानसाम्राज्यपदमीयुषे ।
धर्मचक्रभृते भर्त्रे नमः संसारभीमुषे ।।

वरील जिनमंदिराची प्रतिष्ठा होऊन आज वीर सं. २४७५ माघ वद्य पंचमीस शंभर वर्षे पूर्ण होतात यामसंगीं येथील जैन समाजानें त्या मंदिराचा शत सांवत्सरिक महोत्सव साजरा करण्याचें योजिलें आहे हें उचितच होय.कारण ज्या महापुरुषांनीं अनंत पुण्य संचायक साधन उपस्थित करून ठेविलें आहे त्यांचे उद्देश, ध्येय व संस्कृतिची स्मृति असल्या प्रसंगानें पुनरुज्जीवित होते, धर्म प्रभावना वाढते. लोक सातिशय पुण्यबंध करून घेतात व समाज आणि धर्माचा उत्कर्ष होतो.

मंदिर निर्माण करण्याची परंपरा अनादिकालीन आहे. मंदिर निर्माण करून प्रतिष्ठापित करणाऱ्या धर्मात्म्यास सातिशय पुण्यबंध होतोच, पुढे त्या मंदिरांत दर्शन, पूजा अभिषेक व धर्मचर्चेमध्यें भाग घेऊन जे अनंत जीव अनंतकालपर्यंत अनंतप्रमाण पुण्य बंध करून घेतात त्या सर्व पुण्यांचें पिण्डरूप अर्जन तो प्रतिष्ठापक करून घेतो हें विशेष होय. अतः सर्व संप्रदायामध्यें जीं धर्मकार्ये सांगितलीं आहेत त्यांत मंदिर निर्माणाला विशेष महत्त्वपूर्ण स्थान आहे हें विसरून चालणार नांहीं.

ज्या महात्म्यांनी वरील जिनमंदिर निर्माण करून सर्वांना ह शुभयोग आणून दिला आहे त्यांचा परिचय पुढील प्रकरणांत येई-लच.त्यांनीं या मंदिराचा मूलनायक म्हणून भगवान् आदि देवाची निवड केली आहे. यावरून आदिभगवंताविषयीं त्यांचे हृदयीं विशिष्ट आदर व भक्ति दिसते. यद्यपि सम्यग्दृष्टि जीवांना तीर्थो-द्धारक सर्व तीर्थंकर सारखे आहेत. त्यांचे गुणामध्यें कांहीं अंतर नाहीं. तथापि भक्तगणामध्यें आराध्यदेवांना विशिष्ट दृष्टिकोणानें पाहण्याची प्रवृत्ति असतें. तसे नसतें तर विविध गुणांचे भिन्न भिन्न रूपानें वर्णन करणाऱ्या सहस्रनाम स्तोत्राची रचनाच झाली नसती. म्हणून आपल्या आवडीच्या देवाला निवडे करण्याची प्रवृत्ति प्राचीन कालापासून आहे हें निर्विवाद होय. प्रकृत महापुरुषांनीं आपल्या मंदिरामध्यें आदिभगवंताची प्रतिष्ठा कां केली ? भगवान् वृषभ देवाच्या जीवना मध्यें काय वैशिष्ट्य त्यांनीं पाहिलें याचें ही या

प्रसंगांत अध्ययन केल्यास अनाठायीं न होता उद्बोधकच ठरेल.

भगवान् वृषभेश्वरांचे जीवन अनेक उल्लेखनीय घटनांनीं परिपूर्ण आहे. ज्या कालीं या जगांतील सर्वजीव विशेषतः या कर्मभूमींतील मनुष्य आदि नवीन व्यवस्थेमुळें किंकर्तव्यविमूढ होते आणि कल्पवृक्ष इत्यादिकापासून उत्पन्न अनेक भोगांगांचा नाश झाल्यानें आणि क्रमशः कर्मभूमींतील प्रवृत्तींचा उदय झाल्यानें त्यांचे योग्य उपयोगाविषयीं अनभिज्ञतेमुळें त्रस्त झालें होते त्यावेळीं श्री आदिभगवतानीं अवतार (जन्म) घेऊन संसाराच्या सर्व जीवांना अभयदान दिलें. जीवन सुखमय करण्याचें दिव्य-ज्ञान प्राणिमात्रांना देऊन मार्गदर्शन केलें. प्राणिमात्रांना उत्पन्न झालेली जीवनसंग्रामाची भीति नष्ट होऊन सर्व सृष्टि पुनः यथावत् स्वकर्म प्रवृत्त झाली म्हणून श्री आदिपरमेश्वरांना सृष्टि-कर्ता म्हटलेलें आहे आणि परमात्मतत्वाचें स्वयं अवलोकन करून श्री आदिभगवंतांनीं आध्यात्मिक ज्ञानाचें रहस्य सर्व लोकांस विदित केलें आणि लोकामध्यें ज्ञानसाम्राज्य प्रस्थापित केलें म्हणून त्यांना आदिब्रह्मा म्हणून संबोधिलें आहे. वर्तमान कल्पांतील ते प्रथम तीर्थंकर आहेत. आणि वर्तमान कल्पामध्यें ज्ञान साम्राज्य स्थापण्यामध्यें ते प्रथम आहेत म्हणून त्यांना आदितीर्थंकर हे नांव सार्थकच आहे. तीर्थकरांच्या श्रेणीमध्यें ते प्रथम आहेत. तीर्थंकरांच्या जगदुद्धारक कार्यामध्यें त्यांचें कार्य प्रथम

समजलें जातें. धर्मप्रवर्तनाचें कार्य त्यांनीं प्रथम केलें. या सर्व कारणानीं त्यांची वृषभेश म्हणून अन्वर्थक नांवाने भक्तगण स्तुति करितात. त्रैवर्णिक व त्यांचे आचार, धर्म, पुण्य व सत्कृतिचे उपदेश लोककल्याणाकरिता भगवंतांनी दिले म्हणून त्यांना धर्मसंस्थापक म्हटलेलें आहे. दानप्रवृत्तिची परंपरा भगवंताच्या घोर तपश्चर्येच्या फलस्वरूपानें प्रवृत्त झाली, आणि अक्षय पुण्यवर्धकदानाकडे लोक अहमहमिकेने प्रवृत्त झाले म्हणून अक्षयतृतीयेची कल्पना अव्याहत चालू झाली. कोटिसूर्य व कोटिचंद्राप्रमाणें देदीप्यमान उज्ज्वल असा त्याचा आत्मा माघकृष्ण चतुर्दशीस सर्वकर्ममलकलंक दूर करून शिवपदामध्यें स्थिर झाला म्हणून शिवरात्राची कल्पना या जगामधे प्रसिद्ध झाली. भगवंत शिवपदास गेले, लोक खिन्न झाले, सर्वत्र अमावस्येच्या काळोख.बरोबर दुःखांधकार पसरू लागले ही कल्पना आज ही आम्हास शिवरात्रि देत आहे. ब्राम्ही आणि सुंदरीस शिक्षण प्रदान करून श्री आदिशिवांनीं स्त्रीशिक्षणाचें बीजारोपण करून ठेवलें आहे. आज ही ब्राम्हीलिपिची कल्पना त्या विषयाची आम्हास आठवण देते. याप्रमाणें .भगवंताच्या जीवनांतील अनेक उल्लेखनीय विषय आहेत त्या सर्व विषयांवर विचार करणें येथें अशक्य आहे तथापि जीवनांतील कांही वैशिष्ट्यावर विचार करणें आवश्यक आहे म्हणून येथें खालील हें प्रकरण देण्यांत येत आहे.

श्री तपोनिधि, स्याद्वादकेसरी
श्री १०८ आचार्य पायसागरजी महाराज.

## श्री आदिभगवंताच्या पवित्र चरित्रांतील वैशिष्ट्यें.

या भारतवर्षांत अनेक धर्म प्रचलित आहेत त्यांत अत्यंत प्राचीन व आद्यधर्म म्हणजे जैनधर्म आहे. जिनानीं सांगितलेला जो धर्म तो जैनधर्म होय. जिकण्यास कठिण व संसारांत फिर-विण्यास समर्थ अशीं ज्ञानावरणादि कर्मे ज्यांनीं जिंकिलीं आहेत त्यांना जिन म्हणतात. अशा महापुरुषांनीं सांगितलेला जो धर्म त्यास जिनधर्म किंवा जैनधर्म म्हणतात. ज्यांनीं ह्या धर्माचा उपदेश केला आहे त्यांना तीर्थंकर ही म्हणतात. ते तीर्थंकर चोवीस होऊन गेले. त्या पैकी पहिल्या तीर्थंकराची नावें आदिजिन आदिनाथ, वृषभजिन अशीं आहेत.

तीर्थंकर शब्दाचा अर्थ असा आहे:—
तीर्थ म्हणजे आगम–द्वादशाङ्ग श्रुतज्ञान. हा संसार तरून जाण्याचा उपाय आहे. तो ज्यानीं सागितला त्यांना तीर्थंकर म्हणतात. किंवा तीर्थ म्हणजे जिनानीं सागितलेल्या आगमाचे धारक असे जे जैनमुनि–गणधरादि आचार्य त्यांची जी स्थापना–उत्पत्ति करणें तिला तीर्थ म्हणतात. अर्थात् मुनिधर्माचे धारक गणधरादिकांना उत्पन्न करणारे ते तीर्थंकर होत. जिनेश्वरांनीं जेव्हां आपल्या दिव्यध्वनीनें प्रथम उपदेश केला तेव्हां त्यांनीं द्वादशांगांचें आचार, सूत्रकृत, स्थानांगादि बारा अवयवात्मक–विभागात्मक आगमाचें विवेचन केलें. त्या विवेचनास तीर्थ म्हणतात व तें विवेचन ज्यांनीं हृदयांत धारण केलें त्या व्यक्तींना म्हणजे

गणधरांना ही ते आधारभूत असल्यामुळें तीर्थ म्हणतात. अशा तीर्थाची उत्पत्ति ज्यांनीं केली त्यांना तीर्थंकर म्हणावें. सारांश हा कीं, जिनांनीं सांगितलेले द्वादशांगश्रुत–आगम व त्याला आधारभूत असलेले गणधर मुनि हे संसार तरून जाण्याचे उपाय आहेत म्हणून त्यांना तीर्थ म्हणतात व त्यांची उत्पत्ति करणाऱ्या श्रीवृषभ आदिनाथादि वर्धमान–महावीरापर्यन्त चोवीस महापुरुषांना तीर्थंकर म्हणतात. यास्तव तीर्थ शब्दाची व्याख्या जैनाचार्यांनीं या प्रमाणें सांगितली आहे:—

> जैनश्रुततदाधारौ तीर्थं द्वावेव तत्त्वतः ।
> संसारस्तीर्यते ताभ्यां तत्सेवी तीर्थसेवकः ।

आगम व त्याचे आधारभूत गौतमादि गणधर, कुंदकुंदादिक आचार्य या गुरुपरंपरेला ही तीर्थ म्हणावें व हिच्या द्वारें आम्ही संसार तरून जातो म्हणून या गुरुपरंपरेला नांवें सारखी मानून तिची सेवा करावी, तिचा उपदेश ऐकावा व यथाशक्ति तो आचाररूपानें चारित्ररूपानें पाळावा. या प्रमाणें हिची सेवा करितात त्यांना तीर्थसेवक म्हणावें.

आपला सर्व समाज तीर्थसेवक आहे व श्रीशान्तिसागरादिक आचार्य तीर्थ होत. त्यांची आपण सेवा–भक्ति करितो म्हणून आपण तीर्थसेवक होय.

तीर्थंकर शब्दाचें हें थोडक्यांत समर्थन केलें आहे. आतां आपण आदिभगवंतांना तीर्थंकर कां मानावें? त्यांच्यांत असें

कोणतें वैशिष्ट्य आहे कीं ज्यामुळें जैन व जैनेतरांत ही त्यांची विशेष प्रसिद्धि आहे याचा विचार करूं:—

वेद हा हिंदूंचा अत्यंत प्राचीन ग्रंथ आहे त्याला कोणी अपौरुषेय अर्थात् त्याचा कोणी कर्ता नाहीं असें म्हणतात व कोणी ईश्वराला त्याचें कर्तृत्व देतात. कांहीं कां असेना. ऋग्वेदांत ही चतुर्विंशति तीर्थंकरांची स्तुति केली आहे. ती या प्रमाणें:—

ॐ त्रैलोक्यप्रतिष्ठितान् चतुर्विंशतितीर्थंकरान् ऋषभाद्या-न्वर्धमानान्तान्सिद्धान् शरणं प्रपद्ये । ॐ पवित्रं नग्नमुपवि प्रसामहे एषा नग्ना ( नग्नये ) जातिर्येषां वीरा । इत्यादि ।

त्रैलोक्यांत प्रसिद्ध अशा ऋषभादि वर्धमानापर्यंत चोवीस तीर्थंकरांना मी शरण जातो हे तीर्थंकर कर्मे नष्ट करून सिद्ध झाले आहेत. हे तीर्थंकर परिग्रहरहित नग्न आहेत यांची जाति वीरा अर्थात् क्षत्रियाची आहे व हे कर्मशत्रूचा नाश केल्यामुळें वीर आहेत.

यजुर्वेदांतही आदिभगवंताची स्तुति केलीआहे ती याप्रमाणें—

" ॐ नमो अर्हतो ऋषभो, ॐ ऋषभं पवित्रं पुरुहूतमध्वरं यज्ञेषु नग्नं परमं माहसं स्तुतं वरं शत्रुं जयंतं पशुइन्द्रमाहुतिरिति स्वाहा ।

अर्हंत अशा ऋषभतीर्थंकरास माझा नमस्कार आहे. हे ऋषभनाथ पवित्र, नग्न, उत्तम, तेजस्वी, स्तविलेले, श्रेष्ठ, कर्मशत्रुला जिंकणारे, प्रथमतः मोठा म्हणून ज्यांना बोलाविलें ज्यांचे ऋषभ नांव आहे त्यांना मी आहुति अर्पण करितो.

मनुस्मृतिमध्यें युगादि तीर्थंकर ऋषभजिनाचा उल्लेख तर आहेच पण त्यांच्यापूर्वी जे विमलवाहन, चक्षुष्मान् वगैरे मनु होऊन गेले त्यांचा ही उल्लेख आहे. तो या ठिकाणी आम्ही करितोः—

कुलादिबीजं सर्वेषां प्रथमो विमलवाहनः ।
चक्षुष्मान्यशस्वी चाभिचंद्रोऽथ प्रसेनजित् ॥
मरुदेवश्च नाभिश्च भरते कुलसत्तमाः ।
अष्टमो मरुदेव्या तु नाभेर्जात उरुक्रमः ॥
दर्शयन्वर्त्म वीराणां सुरासुरनमस्कृतः ।
नीतित्रितयकर्ता यो युगादौ प्रथमो जिनः ॥

विमलवाहनादिकापासून नाभिराजापर्यंत मनु झाल्यानंतर नाभिराज आणि मरुदेवी यांच्या उदरीं जगताला हिताचा महामार्ग दाखविणारा, देवासुरांना वंदनीय, वीरांचा अर्थात् कर्म-शत्रूंचा नाश करणाऱ्या जैन मुनींचा-निर्ग्रंथांचा मार्ग लोकांना दाखविणारा, गृहस्थावस्थेंत असताना क्षत्रिय, वैश्य व शूद्राचा आचार सांगून त्या त्या आचारात-आप आपल्या आचारात क्षत्रियादिकांना तत्पर करणारा, कृत युगाच्या प्रारंभीं आदिजिनेश्वर वृषभनाथ झाला.

भागवत ग्रंथांतही जो वैदिक लोकांचा मान्य ग्रंथ आहे. आदिभगवंताचें म्हणजे वृषभ जिनाचें बरेचसें विवेचन आहे. त्याचें येथें संक्षिप्त विवेचन आम्ही करितों.

श्री मैनाबाई आणि श्री रतनबाई.

" नामेः प्रियचिकीर्षया तदवरोधायने मेरुदेव्यां धर्मान्दर्शयितुंकामो वातरशनानां श्रमणानामृषीणामूर्ध्वमन्थिनां शुक्लया तनुवावततार " भागवत पंचमस्कंध तिसरा अध्याय.

नाभिराजाचे प्रिय करण्यासाठीं वृषभजिनानें मेरुदेवी पासून जन्म धारण केला त्याच्या देहाचा रंग शुक्ल होता. आदिजिनाच्या वृषभजिनाच्या पत्नीचे नांव जयंती असें होतें. इंद्रानें या जयंतीचा वृषभजिनाबरोबर विवाह केला होता. वृषभनाथांनीं हिच्या ठिकाणीं भरतादिक शंभर पुत्र उत्पन्न केले. भरत हा सर्वांत ज्येष्ठ होता व श्रेष्ठ गुणांचा होता. याच्या योगानेंच या आर्यखंडाचें भारत वर्ष असें नांव पडलें. याविषयीं असा उल्लेख आहेः—

" अथ ह भगवान्वृषभदेवो....गृहमेधिनां धर्ममनुशिक्षमाणो जयन्त्यामिन्द्रदत्तायां उभय लक्षणं कर्म समाम्नातमभियुञ्जन्नात्मसमानानामात्मजानां शतं जनयामास । येषां खलु महायोगी भरतो ज्येष्ठः श्रेष्ठगुण आसीद्येनेदं वर्षं भारतमिति व्यपदिशन्ति। "

भगवान् वृषभदेवांनीं श्रद्धा, ज्ञान, वैराग्य लक्षणात्मक धर्माचा उपदेश सर्व लोकांना करण्यासाठीं स्वतः पूर्ण निर्ग्रंथ दीक्षा घेतली जींत शरीराशिवाय दुसरा कोणताही परिग्रह नव्हता. दीक्षा घेण्याच्या पूर्वी त्यांनीं पृथ्वीपालनासाठींभरताचा राज्याभिषेक केला. भगवान् वृषभदेव सर्व लोकांचे परममित्र होते. त्यांनीं मुनींना परमहंसांचा धर्म सांगितला. " एवमनुशास्यात्मजान्स्वयमनु-

शिष्टानपि लोकानुशासनार्थं महानुभावः परमसुहृद्भगवान्वृषभापदेशः उपशमशीलानां उपरतकर्मणां महामुनीना भक्तिज्ञानवैराग्यलक्षणं पारमहंस्यधर्ममुपशिक्षमाणः स्वतनयज्येष्ठं.........भरतं धरणिपालनायाभिषिच्य स्वयं उर्वरितशरीरमात्रपरिग्रहः........ब्रह्मावर्तात्प्रवव्राज। भागवत पंचमस्कंध अध्याय ५ वा.

असे अनेक आधार जैनधर्म प्राचीन असल्याचें सिद्ध करितात. जैन धर्माचे आद्य संस्थापक श्रीवृषभदेव आहेत हें वेद भागवतादि ग्रंथ ही कबूल करितात यावरून आदिभगवंताचें ऐतिहासिकत्व सिद्ध होतें.

वेदामध्यें वृषभनाथ, अजित, सुपार्श्वअरिष्टनेमि, वर्धमान यांचा व्यक्तिशः उल्लेख असून समष्टिरूपानें ' मी वृषभादि महावीरापर्यंत चोवीस तीर्थंकराना शरण जातो असेंऋग्वेदाच्या मंत्रांत उल्लेख आहेत. म्हणून सर्व तीर्थंकर ऐतिहासिक आहेत असें वैदिकांना ही मान्य करणें भाग आहे.

रामचंद्राच्या मनावरही जैनधर्माचा प्रभाव पडला होता असें योगवासिष्ठांतील पुढील श्लोकावरून सिद्ध होतें.

नाहं रामो न मे वाञ्छा भावेषु च न मे मनः॥ शान्तिमास्थातुमिच्छामि स्वात्मन्येव जिनो यथा॥

श्रीहर्षकृत नैषधचरित्रांत जिनेश्वराच्या धर्मचिंतामणीची कवीनें जी प्रशंसा केली आहे ती निःसंशय जिनधर्माचें महत्त्व दाखविणारी आहे म्हणून तिचा उल्लेख येथें करणें अनुपयुक्त होणार नाहीं असें वाटतें.

न्यवेशि रत्नत्रितये जिनेन यः स धर्मचिन्तामणिरुज्झितो यया॥
कपालिकोपानलभस्मनः कृते तदेव भस्म स्वकुले स्तृतं तया॥

जिनेश्वरानें रत्नत्रयामध्यें धर्मचिन्तामणि स्थापन केला आहे. अर्थात् पातिव्रत्य शीलरूपी चारित्रचिन्तामणि रत्ना प्रमाणें इच्छित स्वर्गादि सुखें देणारा असल्यामुळें त्याचा रत्नत्रयामध्यें अर्थात् चारित्रामध्यें जिनेश्वरानें अन्तर्भाव केला आहे. अशा चारित्र-चिन्तामणीचा–शीलाचा–पातिव्रत्याचा महादेवाच्या कोपरूपी अ-ग्नीचें भस्म असलेल्या मदनासाठीं जिनें त्याग केला आहे तिनें आपल्या कुलावर तेंच भस्म आच्छादित केलें आहे. असें म्हणावयास हरकत नाहीं. तात्पर्य हें कीं, शील हें चिन्तामणि रत्नाप्रमाणें दुर्लभ आहे म्हणून जिनेश्वरांनीं त्यास धर्मचिन्तामणि असें नांव देऊन सम्यग्दर्शन, सम्यग्ज्ञान व सम्यक्चारित्रांत त्याची गणना केली आहे. अशा रीतीचें शील कामवश होऊन स्त्रीपुरुषानीं त्यागू नये. अर्थात् शीलाला महत्त्व जैनधर्मानें दिलें असल्यामुळें तो धर्म चिन्तामणि प्रमाणें दुर्लभ आहे. त्याची योग्यता वैदिक धर्माला येत नाहीं असा अभिप्राय वैदिक धर्माच्या श्री हर्षकविनें या श्लोकांत व्यक्त करून दि. जैन धर्माची प्रशंसा केली आहे.

वेद व भागवतादि ग्रंथांत वृषभदेव आदिभगवंताचा उल्लेख आहे. हें आम्हीं वर दाखविलें आहे. नाभिराज व मरुदेवी यांच्या पोटीं या महापुरुषाचा जन्म झाला व त्यानें निर्ग्रंथांचा जैनमुनींचा धर्म सांगितला. एवढेंच नव्हे तर त्यांचें आचरण स्वतः करून त्यांनीं या भारतवर्षांत अनेक देशांत विहार केला.

असा स्पष्ट उल्लेख सविस्तर केला आहे. या दृष्टीनें प्रभू आदि-भगवंताचें वैशिष्ट्य आहे. व जैनग्रंथांत ही त्यांचीं अनेक वैशिष्ट्यें सांगितलीं आहेत. त्यापैकीं कांहीं येथें नमूद करितों.

अत्यंत प्राचीन कालीं हा भारतवर्ष म्हणजे आर्यखंड भोगभूमि म्हणून प्रसिद्ध होता. येथें दहा प्रकारचे कल्पवृक्ष होतें.ते येथील लोकांना म्हणजे महापुण्यवान् आर्यांना इच्छित धन धान्य, वस्त्रभूषणें इत्यादिक देत असत. याप्रमाणें ही भोगभूमीची परिस्थिति येथें दीर्घकाल नांदत होती. पुढें अवसर्पिणी कालाच्या प्रभावामुळें हें भोगभूमीचें स्वरूप ऱ्हास पाऊ लागलें व कर्म-भूमीचीं वैशिष्ट्यें वेगवेगळीं प्रगट होऊ लागलीं. त्याचें लोकांना ज्ञान नसल्यामुळें त्यांना भय उत्पन्न झालें व त्यावेळीं त्या भिन्न भिन्न परिस्थितीची माहिती करून देऊन लोकांना निर्भय करणारे, त्यांचें रक्षण करणारे व कसें वागावें याचें शिक्षण देणारें असे जे प्रभावशाली विद्वान ज्यांना मागील जन्माचें स्मरण होतें किंवा दूरचे द्रव्य क्षेत्र ,काल भावाचें स्वरूप सांगणारे अवधिज्ञान ज्यांना होतें असे चालकशासक जन्माला आले त्यांना मनु-कुलकर असें ही म्हणतात. हे मनु प्रतिश्रुति, सन्मति, क्षेमंकर, क्षेमंधर वगैरे नांवाचे होते. हे मनु चौदा झाले. चौदाव्या मनूचें नांव नाभिराज असें होतें.या मनूच्या वेळीं जन्मलेल्या मुलाला नाळ दिसू लागली तेव्हां ती कापून कशी टाकावी याचें ज्ञान त्यानें लोकांना करून

दिलें म्हणून त्यास नाभिराज म्हणत असत. आणखी अनेक गोष्टींचें ज्ञान त्यानें लोकांना करून दिलें.

लोकांनीं कांहीं अपराध केला असतां हे मनु त्यांना दंडित करीत असत पण तो दंड शाब्दिक होता. तेवढ्यानें लोक अन्यायापासून निवृत्त होत असत. ते निवृत्त करण्याचे शब्द म्हणजे हा, मा, धिक् असे होते. अरेरे, असें अकार्य करू नकोस, व तुला धिक्कार असो असा या शब्दांचा क्रमशः अभिप्राय आहे. असो.

इन्द्रानें नाभिराज व मरुदेवी यांचा विवाह केला व अयोध्या नगरीची सुंदर रचना केली. त्यांच्या पोटीं श्रीआदिभगवंताचा जन्म झाला.

प्रभूंनीं लोकांचें कसें रक्षण केलें याविषयांची माहिती याप्रमाणें आहे:—

कल्पवृक्षांचा अभाव झाल्यामुळें प्रजा भूकतहान वगैरे बाधांनीं पीडित होऊन ती नाभिराजाकडे येऊन " आम्ही भुकेनें पीडित झालो आहोत. आम्ही आतां काय उपाय करावा सांगा असें म्हणू लागली. तेव्हां नाभिराजानें तुम्ही आदिनाथाकडे जा तो प्रभु तुम्हाला उपाय सांगेल असें म्हटलें. " आदिभगवंताकडे आल्यावर त्यांनीं त्यांना त्यांची हकीकत ऐकून याप्रमाणें उपाय सांगितला:—

" हे प्रजाजनहो, या पृथ्वीवर वृक्ष, लता झुडपें, व गवत वगैरे प्रकारची वनस्पति उत्पन्न झाली आहे. हींत भोज्य आणि

अभोज्य असे दोन भेद आहेत. सध्या तुम्हाला भोज्य वनस्पतींची माहिती देतो. आंबा, लिंबु, जांभळ, खजूर, फणस, केळी, महाळुंग, नारिंग, सुपारी कवठ, बोर, चिंच, वगैरे वृक्ष भोज्य आहेत. यांचीं फळें खाण्या योग्य आहेत. द्राक्षा, कोहळा, वाळूक वगैरे हीं वेलीला येणारीं फळें, आहेत. हे पदार्थ भोज्य-खाण्याला योग्य आहेत, गहू, मूग, ज्वारी, तांदूळ, उडीद वगैरे अनेक प्रकारच्या धान्यांची माहिती प्रभूंनीं दिली. हीं भोज्य-खाण्यास योग्य आहेत. यांनीं भूक नाहींशी होऊन शरीर पुष्ट होतें असें प्रभूनीं सांगितलें.ही धान्यें शिजविण्याकरितां व त्यांचा संग्रह करण्याकरितां अनेक प्रकारचीं भांडीं कशीं बनवावीत यांचें शिक्षण त्यांनीं जनतेला दिलें.

प्रभूनीं लोकांच्या जीवनासाठीं असि, मषि, कृषि, विद्या, वाणिज्य व पशुपालन या सहाकार्यांची माहिती सांगितली. व अशी माहिती प्रजेला झाल्यानुळें ती अतिशय सुखी झाली.

प्रभूंनीं विवाहादि संस्कारांचे नियम सांगितले व त्याप्रमाणें प्रजा त्या नियमांनीं वागू लागलीं.

प्रभूनीं भरत, बाहुबलि वृषभसेनादि शंभर पुत्रांना बाहात्तर कलांचें शिक्षण दिलें. याचप्रमाणें प्रभूंना ब्राह्मी व सुंदरी या दोन कन्यांना वाङ्मयाचें शिक्षण दिलें. प्रभूनीं स्वायंभुव नामक व्याकरण रचिलें होतें असा महापुराणांत उल्लेखआला आहे. इंद्र आणि नाभिराज यांनीं प्रभूला राजसिंहासनावर स्थापन केलें.

प्रभूनीं उत्तम रीतीनें त्याकाळीं भारतवर्षाचें-आर्यखंडाचें रक्षण केलें.

प्रभूनीं रक्ष्य व रक्षक असे प्रजेमध्यें दोन वर्ग केले. क्षत्रियांना रक्षक वर्ग आणि वैश्य व शूद्र यांना रक्ष्यवर्ग ठरऊन या त्रिवर्णाची कर्तव्यें त्यांनीं निश्चित करून दिली. क्षत्रिय हे प्रजासंरक्षण करण्यासाठीं असिकर्म करूं लागले वैश्य हे शेती, पशुपालन व व्यापार करूं लागले. आणि शूद्रांची या दोन वर्णांची सेवा करणें ही वृत्ति ठरविली. अशा या तीन वर्णांची स्थापना प्रभूनीं केली.

प्रभूनीं नाना देश, गांवें, शहरें यांची रचना कशी असावी हें ही सांगितलें.

त्यांनीं क्षत्रियांचे इक्ष्वाकु, कौरव, हरिवंश आणि नाथवंश असे चार वंश ठरविले. अशा या प्रजेच्या जीवनाची चांगली व्यवस्था प्रभूंनीं केली. आपल्या अवधिज्ञानानें विदेह क्षेत्रांतील सर्व व्यवस्था जाणून घेऊन तशीच येथें सुव्यवस्था केली तर प्रजा जगेल. असें त्यांनीं ठरविलें व त्याप्रमाणें केलें म्हणून सर्व प्रजा त्यांना ब्रह्मा, सृष्टिकर्त्ता, विधाता असें म्हणू लागली. ही सर्व कर्मभूमिची व्यवस्था भगवंताच्या पूर्वी दीर्घकालपर्यंत भोग-भूमीची येथें स्थिति असल्यामुळें लुप्त झाली होती. ती सर्व भगवंतांनीं पुनः चालू केली यामुळें प्रजानीं त्यांना ब्रह्मा वगैरे नांवांनीं प्रशंसिलें आहे. आचार्य गुणभद्र यांनीं आदिपुराणांत असा उल्लेख केला आहे—

पथः पुरातनान्येऽत्र भोगभूमितिरोहितान् ।
कुर्वते नूननान्सन्तः पूज्याः सद्भिस्त एव हि ॥

भोगभूमिमुळें जे प्राचीन सन्मार्ग लुप्त झाले होते त्यांना ज्यांनीं पुनः प्रगट करून प्रचारांत आणिले असे सत्पुरुष पूज्य होत. भगवान आदिप्रभु शिवाय सगळ्या जगाची सुव्यवस्था इतर कोणासही त्यावेळीं लावतां आली नाहीं. प्रभूनीं आपल्या विशाल ज्ञानानें ही सुव्यवस्था लाविली व ती इतकी निर्दोष आहे कीं ती कायमची जीवनोपयोगी ठरली आहे. असा प्रभावशाली महात्मा अतिशय प्राचीन कालीं जन्मला म्हणून त्यास प्रजापति, आदिनाथ असें सर्व लोक म्हणू लागले. आदि भगवंताच्या ठिकाणीं प्रजापति या शब्दाची सार्थकता स्वयंभूस्तोत्रांत श्रीसमंतभद्राचार्यांनीं दिली आहे–

प्रजापतिर्यः प्रथमं जिजीविषुः शशास कृष्यादिषु कर्मसुप्रजाः ॥
प्रबुद्धतत्त्वः पुनरद्भुतोदयो ममत्वतो निर्विविदे विदांवरः ॥

अर्थात्–कर्मभूमीच्या प्रारंभीं भुकेनें तहानेनें थंडी, वारा, उष्ण इत्यादिकांनी आपण उपाय नाहीं सांगितला तर आम्ही मरून जाऊ यास्तव ह्या पीडांपासून आमचें रक्षण करा असें प्रजानीं म्हटल्यावर प्रभूंनी शेतकी वगैरे सहा उपाय सांगून त्यांचें दुःख दूर केलें म्हणून ते सर्व प्रजांचे पति-स्वामी-रक्षक झाले. यास्तव ते पहिले प्रजापति होत. याच्यानंतर भरतादिक अनेक प्रजापति-प्रजारक्षक राजे झाले.

प्रभूनीं दीर्घकाल राज्य केलें. एकदा प्रभूचे सभेंत इन्द्रानें ' नीलंजसा ' नामक देवतेस नृत्य करण्याची आज्ञा दिली. ती नृत्य करित असतां आयुष्य संपून मरण पावली. तिचा देह अदृश्य झाला पण इंद्रानें तत्काल आपल्या विक्रियासामर्थ्यानें दुसरी नीलंजसा तयार केली. तिचें नृत्य पूर्वीच्या नीलंजसेप्रमाणेच खंड न पडतां चालू झालें, परंतु आदिभगवंतांनीं खरा प्रकार जाणला ते विरक्त झाले. त्यांनीं भरताला राज्य दिलें. प्रभूंनीं चैत्रकृष्ण नवमीच्या दिवशीं जेव्हां दीक्षा घेतली तेव्हां त्यांच्या बरोबर चार हजार राजांनीं दीक्षा घेतली. तीर्थंकर हे जन्मतःच त्रिलोकगुरु असल्यामुळें ते स्वतःच दीक्षा घेत असतात. त्यांनीं सर्व परिग्रहांचा त्याग ' नमः सिद्धेभ्यः ' असें म्हणून केला. केशलोच करून समिति, गुप्ति, महाव्रतें, इन्द्रियविजय इत्यादिक मुनींचे अठ्ठावीस मुख्यगुण–मूलगुण धारण केले. सहा महिने पर्यंत ध्यान धारण केलें.

बाकीच्या राजांना–मुनींना भूक, तहान सहन न झाल्यामुळें ते नग्नदीक्षा सोडून स्वैराचारी व अनेकवेष–धारक झाले. सहा महिन्यानंतर प्रभूंनीं ध्यानविसर्जन केलें. सर्व दीक्षित मुनि भ्रष्ट झाले असें त्यांना आढळून आलें. त्यानीं आहारानेंच दीक्षेंत अर्थात् मुनिधर्मांत असमर्थ मुनींना राहतां येतें यास्तव या सर्वांना मुनींनीं आहार कसा घ्यावा हें दाखऊन द्यावें म्हणून आहार घेण्यासाठीं प्रभु विहार करूं लागले. लोकांना प्रभूच्या विहाराचा उद्देश समजला नाहीं म्हणून ज्याला जें योग्य वाटतील ते पदार्थ–

कन्या,वस्त्र, धनादिक भगवंतापुढें आणून त्यांना अर्पण करूं लागले. प्रभूंनीं त्यांचा स्वीकार केला नाहीं. ते विहार करीत करीत सहा महिन्यांनीं हस्तिनापुरास आले. या प्रमाणें निराहारांत एक वर्ष प्रभूंचें पूर्ण झालें.

त्यावेळीं कुरुवंशाचे राजे म्हणून श्रेयान् आणि सोमप्रभ या दोघांची कुरुजांगलदेशाच्या राज्यावर आदि भगवंतांनीं स्थापना केली होती. त्यांनीं प्रभूंना आपल्या राजवाड्यांत येतांना पाहिलें. राजा श्रेयान् यास " प्रभु वज्रजंघाचे भवांत असतांना आपण त्यांची पत्नी श्रीमती म्हणून होतो व आम्ही दोघांनीं चारण-मुनि युगलास आहार दिला होता " असें जातिस्मरणानें समजलें, मुनींना आहार कसा द्यावा याची पूर्ण माहिती त्यास झाली व त्यानें प्रभूंना उसाच्या रसाचा आहार दिला. आहारा नंतर प्रभूंनीं ' अक्षयदानमस्तु ' असा आशीर्वाद देऊन प्रयाण केलें. प्रभूच्या आहारामुळें देवांनीं श्रेयांस राजाच्या राजवाड्यांत पंचाश्चर्यांची वृष्टि केली. श्रेयान् राजानें वैशाख शुद्ध तृतीयेच्या दिवशीं भगवंतांना प्रथम आहार दिला व ' अक्षयदानमस्तु ' असा आशीर्वाद भगवंतानीं दिला म्हणून त्या दिवसाला ' अक्षय तृतीया म्हणतात. हा सण जैनांचा प्रसिद्ध सण आहे कारण या दिवशीं दानतीर्थाची प्रसिद्धि झाली. व श्रेयान् राजा ' दानतीर्थकर ' म्हणून प्रसिद्ध झाला तें या प्रमाणें:—

पूरिय संवच्छर उववासें, अक्खयदाणु भणिउं परमेसें ॥ तहु दिवसहु अत्थेण समायउ । अक्खयतइय णाउं संजायउ ॥

पुप्फदन्तमहापुराण नवम संधि ॥

आद्यो जिनो नृपः श्रेयान्व्रतदानादिपूरुषौ ।
एतदन्योन्यसंबंधे धर्मस्थितिरभूदिह ॥
पद्मनन्दिपञ्चविंशतिश्रावकाचार ॥

आहारदानाचा विधि भरतादिकांनाही माहित नव्हता म्हणून ते श्रेयान्‌राजाकडे आले व त्यांनीं भगवंतांचा मनोऽभिप्राय आपण कसा जाणला व दानविधि कसा याचें स्वरूप सांगा असें म्हटल्यावरून राजा श्रेयांसनें सर्व वृत्त सांगितलें. या नंतर सत्पात्रांना आहार कसा द्यावा ? नवधा विधि कोणता ? सप्तगुण दात्याचे कोणते? सत्पात्राचे भेद किती ? इत्यादिकांची माहिती सर्व श्रावकांना झाली व त्यामुळें गृहस्थधर्म व मुनिधर्माचें स्थितीकरण झालें.

तद्दर्शनसमानन्दाज्ज्ञातपूर्वभवस्मृतिः ।
श्रेयान्सोमप्रभेणामा पपात जिनपद्युगम् ॥२४०॥
विधिना विधिवद्राघे तृतीयादिवसे स च ।
मधुरेक्षुरसेनास्य कारयामास पारणम् ॥२४१॥
शुभचन्द्रविरचिते पाण्डवपुराणे

भगवंतांनीं वनांत येऊन तप केलें. एक हजार वर्षेपर्यंत यांनीं मौनावस्थेंत राहून विहार केला. या नंतर ज्ञानावरणादि घातिकर्मांचा नाश करून त्यांनीं फाल्गुन कृष्णएकादशीचे दिवशीं सर्वज्ञत्वाची प्राप्ति करून घेतली. गृहस्थधर्म आणि मुनिधर्माचा सर्व आर्यखंडांत दिव्यवाणीनें उपदेश केला व ते जैनधर्माचे आद्यतीर्थंकर झाले या विषयीं असा उल्लेख आहे.

जिनःसहस्रवर्षान्ते फाल्गुनैकादशी दिने ।
कृष्णपक्षेऽथ सम्प्रापत्केवलज्ञानमद्भुतम् ॥२४३॥

श्री शुभचंद्रकृत पाण्डवपुराण द्वितीय पर्व.

दीक्षा घेऊन भ्रष्ट झालेल्या चार हजार राजांनीं प्रभूच्या उपदेशानें पुनः मुनिदीक्षा घेतली व त्यांनीं आत्महित साधून घेतलें. दीर्घकालपर्यंत त्यांनीं धर्मोपदेश दिला. जैन धर्माचीं तत्त्वें, व त्याचा आचार, गुणस्थान, मार्गणा, जीवसमास इत्यादिकरूपाचें जीवविषयक तत्त्वज्ञान, आत्म्याला संसारांत भ्रमविणारें कर्म, त्याचे भेद प्रभेद व त्यापासून सुटका करून आत्मा कसा निर्मल व अनंत ज्ञानादिगुणानीं संपन्न करता येईल इत्यादि उपदेश देऊन त्यांनीं मोक्षमार्ग जनतेला दाखविला.

या नंतर जेव्हां प्रभूचें आयुष्य चौदा दिवसांचें राहिलें त्या वेळीं ते कैलास पर्वतावर गेले. यांनीं योगनिरोध केला अर्थात पूर्वेकडे तोंड करून विहार व धर्मोपदेश बंद केला. ते पल्यंकासनानें बसले. चौदावे दिवशीं अर्थात् माघ कृष्ण चतुर्दशीच्या दिवशीं सूर्योदय समयीं अघातिकर्मांचा नाश करून मुक्त झाले. तो पूर्ण दिवस जिनरात्री म्हणून प्रसिद्ध आहे. यासच अन्य धर्मीय–हिंदु धर्मीय लोक महादेवाची महाशिवरात्र म्हणतात. अर्थात् आदिभगवंताला जैनशास्त्रें महादेव म्हणतात व त्यांच्या मुक्तिदिवसाला शिवरात्र ही म्हणतात.

आदिभगवंत पूर्वीच्या तिसऱ्या भवांत ते वज्रनाभि नांवाचे मुनि असुतांना त्यांनीं तीर्थंकरपद प्राप्त करून देणाऱ्या दर्शनविशुद्धचादि सोळा भावना मनांत भाविल्या होत्या. त्यांच्या अन्तःकरणांत मिथ्याधर्मांत तत्पर झालेल्या लोकांना सन्मार्ग दाखविण्याची तीव्र उत्कंठा होती. नानाप्रकारच्या दुःखांनीं भरलेल्या संसारवनांत भटकत असलेल्या भव्यांना सन्मार्ग दाखऊन त्यांचें आत्महित करण्याचे विचार सदैव घोळत असत. ते नेहमी शास्त्राध्ययन करीत असत. गुरूंची व साधर्मिकांची शुश्रूषा करीत असत. यथाशक्ति तप करीत असत. महाव्रतें, गुप्ति, समिति, क्षमादिक धर्मांचें पालन करून, साधर्मिकावर गाईप्रमाणें प्रेम करीत होते. ज्ञान, तप, जिनपूजा इत्यादिकांनीं धर्मप्रभावना करीत होते. अशा कार्यांनीं ते आयुष्य संपल्यावर सर्वार्थसिद्धि विमानांत अहमिन्द्र झाले व तेथील आयुष्य संपल्यावर ते नाभिराज आणि मरुदेवी यांच्या उदरीं जन्मले.

आदिभगवंताचे मागील भवाचा उल्लेख याप्रमाणें आहे. पहिला भव जयवर्ममुनि, दुसरा भव महाबल विद्याधर, तिसरा भव ललितांगदेव, चौथ भव वज्रजंघ राजा, पांचवा भव भोगभूमींतील आर्य, सहावा भव सौधर्म स्वर्गांत देव, सातवा सुविधि राजा, आठवा भव अच्युतेन्द्र, नववा भव वज्रनाभि चक्रवर्ती आणि दहावा भव सर्वार्थसिद्धि अनुत्तरविमानांत अहमिन्द्रदेव व अकरावा भव वृषभदेवाचा. हा अकरावा भव जन्म-

जरामरणांनीं रहित असल्यामुळें श्रीजिनसेनाचार्यांनीं वृषभ-देवाची ' दशावतारनिर्धार्य मां पाहि परमेश्वर ' दहा अवतरांनीं निश्चित झालेल्या प्रभो वृषभेश्वरा ! माझें संसारापासून रक्षण कर अशी स्तुति केली आहे.

याप्रमाणें विविध वैशिष्ठ्य पूर्ण जीवन भगवान् आदि प्रभूंचें आहे, म्हणून आदिनाथाचे महत्त्व जगांतील सर्वधर्मीयांनी मान्य केलें आहे. याविषयाचा उल्लेख हिंदूचे प्रसिद्ध चार वेद, सहा आगम आणि अठारा पुराणामध्यें यत्र तत्र पाहण्यास मिळतो. कांहीं उतारे खालीं देण्यांत येत आहेत.

एकषष्टिषु तीर्थेषु, यात्रायां यत्फलं भवेत् ॥
आदिनाथस्य देवस्य, स्मरणेनापि तद्भवेत ॥ १ ॥

( नागर पुराण. )

भावार्थः—एकसष्ट तीर्थांची यात्रा केल्यानें जें पुण्यफल मिळतें तें आदिनाथाच्या स्मरणानेंहि प्राप्त होतें.

वृषभं भासमानानां, सपत्नानां विषासहितम् ॥
हंतारं शत्रुणां कृधि विराजं गोपितं गवाम् ॥ १ ॥

( वेद. )

भावार्थः—वृषभनाथ हे कर्मशत्रूंचा नाश करणारे आहेत.
वृषभादीनां महायोगीनामाचरे दृष्ट्वा अर्हदादयो मोहितः ॥

( महाभारत शांतिपर्व अध्याय २६३ )

समिद्धस्य प्रमहऽग्ने वंदे तवश्रियं वृषभो ॥
गम्यवानसि ममध्वरेष्विध्यसे ॥

( ऋग्वेद ३ । ४ )

भावार्थः—भो वृषभदेव ! आपण उत्तम पूजकाला लक्ष्मी देतां ह्मणून नमस्कार करितों आणि या यज्ञामध्यें पूजितों.

वृषभं भगवद्‌वतारभेदे आदिजिने ॥

चिंतामणि शब्दार्थ ४४३

ॐ वृषभं पवित्रं नग्न मुपवि ( ई ) प्रसामहे ॥
येषां नग्ना ( नग्नये ) जातिर्येषां वीरा ॥

( ऋग्वेद )

भावार्थः—यजमान ह्मणतो आह्मी पवित्र [ शुद्ध ] आणि पापापासून मुक्त करणारे नग्न दिगंबर देवाला प्रसन्न करितों, ज्याची जाति नग्न असून वीराप्रमाणें बलवान् असते.

" वृषभदेवानें भरतराजाला गादी दिली आणि दीक्षा घेण्यासाठीं तो वनांत गेला. " ( मार्कंडेय पुराण अ. ३ ) " जैनांच्या प्रथमतीर्थंकराची स्तुति केली आहे आणि वृषभाला महर्षि ह्मटलें आहे आणि त्यांच्या उपदेशाचीहि प्रशंसा केली आहे "

( भागवत अ. स्कंध ५ पृ. ३६६ )

ॐ त्रैलोक्यप्रतिष्ठितानां, चतुर्विंशतितीर्थंकराणां ॥
वृषभादिवर्धमानान्तानां सिद्धानां शरणं प्रपद्ये ॥ १ ॥

( ऋग्वेद. )

भावार्थः—वृषभापासून वर्धमान तीर्थंकरापर्यंत त्रैलोक्यांत प्रतिष्ठित त्यांना मी शरण जातों.

" ॐ नमोर्हन्तो वृषभो ,, [ वृषभ देवाला नमस्कार असो ]
" ॐ वृषभं पवित्रं पुरुहूतमध्वरं यज्ञेषु नग्नं परमाह-
संस्तुतं वारं शत्रुंजयं तं पशुरिंद्रमाहुरिति स्वाहा ,,

[ यजर्वेद अ० २५ न० ९ ]

यामध्यें ऋषभ देवाला नमस्कार करून त्यास हवी दिल्याचा उल्लेख केला आहे.

भागवताचे टीकाकार लाला शालिग्राम पृ० ३७२ मध्यें ह्मणतात—" शुकजीनें वृषभदेवाला नमस्कार केला आहे,, टीकाकार ह्मणतात–" भगवान् वृषभानें जगाला मोक्ष मार्गाचा उपदेश केला ह्मणून आणि मोक्षास गेले ह्मणून शुकजीनें प्रणाम केला आहे.

" नाभिस्तु जनयेत्पुत्रं, मरुदेव्यां मनोहरम् ॥
वृषभं क्षत्रियश्रेष्ठं, सर्वक्षत्रस्य पूर्वजम् ॥ १ ॥
ऋषभात्मा ततो जज्ञे वीरपुत्रः शताग्रजः ॥
अभिषिच्य भरतं राज्ये महाप्राव्रज्यमाश्रितम् " ॥ २ ॥

भावार्थः—श्रीनाभिराज आणि मरुदेवीपासून वृषभाचा जन्म झाला. तो श्रेष्ठ आणि क्षत्रियांत पहिला होता. भरताला राज्य देऊन आपण दीक्षा घेता झाला. हा मार्गदर्शक आणि सर्व देवांनीं नमस्कार केलेला प्रथम तीर्थंकर झाला.

कैलासे विमले रम्ये वृषभोऽयं जिनेश्वरः।
चकार स्वावतारं यः सार्वः सर्वगतः शिवः॥
अष्टषष्टिषु तीर्थेषु यात्राया यत्फलं भवेत्।
आदिनाथस्य देवस्य, स्मरणेनापि तद्भवेत्" ॥

शिवपुराण—

भावार्थः तो वृषभदेव कैलासपर्वतावर अवतार धारण करिता झाला. तो सर्वांचा कल्याणकर्ता आहे. अडुसष्ट तीर्थांची यात्रा केल्यानें जितकें फल मिळेल; तितकें फल श्री आदिनाथाचें स्मरण केल्यानेंहि मिळतें.

महाभारत,—

रैवताद्रौ जिनो नेमिर्युगादिर्विमलाचले।
ऋषीणामाश्रमादेव, मुक्तिमार्गस्य कारणम्॥

भावार्थः—कैलास पर्वतावर आदिनाथ ( वृषभ ) तपश्चरण करून मोक्षास गेले व गिरनार पर्वतावर तपश्चर्या करून नेमिनाथ मोक्षास गेले. ( सर्व ऋषींना मुक्तीचा कारण झाले. )

नागपुराण,—

दर्शयन् वर्त्म वीराणां, सुरासुरनमस्कृतः ।
नीतित्रयस्य कर्ता यो युगादौ प्रथमो जिनः ॥
कैलासे विमले रम्ये, ऋषभोऽयं जिनेश्वरः ।
चकार स्वावतारं यः सार्वः सर्वगतः शिवः ॥

भावार्थः—वीर पुरुषांना मार्ग दाखविणारा, सुरासुरांनीं ज्याला नमस्कार केला आहे, तीनहि प्रकारच्या नीतींचा उपदेश करणारा आणि श्रेष्ठ असा युगाच्या आरंभीं प्रथम जिनेश्वर झाला. सर्वांचा हितकर्ता, सर्व ठिकाणीं केवलज्ञानानें व्यापणारा आणि शिवरूप ( कल्याणरूप ) असा हा वृषभ जिनेश्वर, निर्मल आणि मनोरम अशा कैलास पर्वतावर आपला अवतार घेता झाला. ( मोक्षास गेला. )

मि. आबे, जे. ए. डवाई मिशनरी—निःसंदेह जैनधर्म हा, पृथ्वीच्या पाठीवर एक सच्चा धर्म आहे. मनुष्यप्राण्यांचा हाच आदिधर्म आहे आणि आदीश्वराला चोवीस तीर्थंकरांत पहिला तीर्थंकर मानिला आहे.

श्री तुकाराम कृष्ण शर्मा लठ्ठु पी. एच्. डी., एम्. आर. ए. एस. एम्. ए. प्रोफेसर संस्कृत कॉलेज अध्यापक क्विन्स कॉलेज बनारस म्हणतात,—" सर्वांच्या प्रथम, भारत वर्षांत वृषभदेवजी नामक महर्षि उत्पन्न झाले. हे दयावान्, भद्र परिणामी, पहिले तीर्थंकर झाले. ज्यांनीं मिथ्यात्व अवस्था पाहून सम्यग्दर्शन, सम्यग्ज्ञान आणि सम्यक्चारित्र रूपी शास्त्राचा उपदेश

केला, यांच्या पाठीमागून ( महावीरापर्यंत ) तेवीस तीर्थंकरांनीं वेळोवेळीं अज्ञानी जीवांचा अज्ञानमोह अंधकाराचा नाश केला. ''

पंडित मेक्समुलर ( युरोपीयन ) वयाच्या ७६ व्या वर्षी [ सन १८९९ इ० मध्यें ] म्हणतात,—'' प्राचीनकाळीं महात्मा वृषभदेव अहिंसा धर्माचा उपदेश करीत होते. यांच्या उपदेशानें मनुष्य, देव आणि इतर प्राणी उपकृत झाले आहेत. यावेळीं ३६३ पाखंडी मतवाले होते. त्यांत चार्वाक नेता बृहस्पति हाहि होता. [ जै० जा. म. पा. ५० ]

श्रीस्वामी विरूपाक्ष वड्डियर धर्मभूषण, वेदतीर्थ, एम्. ए. संस्कृत प्रो० इंदूर कॉलेज म्हणतात,—'' जैन लोकांनीं ब्राह्मणांच्या यज्ञांतील हिंसा बंद करण्याची वेळ आणिली. त्यांत जैन यशस्वी झाले; पण ब्राह्मण लोक त्यांचा द्वेष करूं लागले, तरी भागवतामध्यें भगवान् वृषभदेवाचा उल्लेख केल्याचा आणि स्तुति व गौरव केल्याचा आधार सांपडतो.

भागवताचे पंचमस्कंधामध्ये भगवान् वृषभदेवाचे चरित्र सविस्तर उल्लेखिलें आहे. त्याचे संक्षिप्त उद्धरण येथें देण्यांत येत आहे, ज्यामध्यें भगवान् आदिप्रभुविषयीं आदरपूर्ण उद्गार आहे.

'' अथाह भगवानृषभदेवः स्ववर्षं कर्मक्षेत्रमनुमन्यमानः गृहमेधिनां धर्ममनुशिक्षमाण आत्मजानामात्मसमानानां शतं जनयामास।

येषां खलु महायोगी भरतो ज्येष्ठः श्रेष्ठगुण आसीद् येनेदं भारत-वर्षमिति व्यपदिशंति । भगवानृषभसंज्ञ आत्मतंत्रः स्वयं नित्य-निवृत्तानर्थपरम्परा ईश्वर एव कालेनानुगतं धर्ममाचरणेनोपशिक्षयत् ॥ तद्विदां सम उपशांतो मैत्र. कारुणिको धर्मार्थ यशः प्रजानंदा मृतावरोधेन गृहेषु लोकं नियमयत् ॥

भावार्थः—भगवान् वृषभदेवानें भारतवर्षांत कर्म भूमीचा आरंभ झाला असें जाणून गृहस्थ लोकांना धर्म शिकविला. आणि आपण मोक्षास प्रवृत्त 'झाले. यांना १०१ पुत्र होते. त्यांमध्यें ज्येष्ठ भरत होते. याच्या नांवानेच या भूप्रदेशाला भरतखंड हें नांव चालू झालें.

भागवत स्कंध ५ यामध्यें,—

" वृषभदेवानें आपल्या राज्याचे नऊ हिस्से करून नऊ पुत्रांना वांटून दिले. कुशपुत्राला जो भाग दिला त्यांचें नांव " कुशावर्त " असें पडलें. ब्रह्मपुत्राला दिलेल्या भागाचें " विदर्भ " इत्यादि अशीं नऊ पुत्राच्या नांवांवरून देशांची नांवें पडली. ( आणि अजूनहि तींच नांवें चालू आहेत. हिंदूंच्या पुराणांत या विदर्भाची व्याख्या मात्र वेगळीच कल्पिली आहे. वऱ्हाड देशाचा राजा विराट याच्या मुलीच्या लग्नाला आलेल्या वऱ्हाडावरून विदर्भाचें नांव वऱ्हाड झालें. या लग्नांतील वधूवर म्हणजे श्रीकृष्ण आणि रुक्मिणी. या वधूवरांच्या नांवाशीं मात्र या देशाच्या नांवाचा संबंध नाहीं. देशाच्या वऱ्हाडावरून या देशाच्या नांवांत फरक पडणें शक्य नाहीं. विदर्भ याचा अपभ्रष्ट शब्द म्हणजे वऱ्हाड

असा झाला असावा. भगवान् वृषभदेवाच्या पुत्रांच्या नांवावरूनच पूर्वे कालीं जीं देशांचीं नावें पडलीं तींच खरीं आहेत.

यजुर्वेद—

विश्वदेव ऋषभं पवित्रं पुरुहूतमध्वरं यज्ञेषु नग्नं परमं पवित्रं ।
श्रुतेधीरं यज्ञपतिः प्रधानं ऋतु यजत पशुमिंद्रं आहवेति स्वाहा ॥

अरण्यपुराण—

ऋषभ एव भगवान् ब्रह्मा तेन ब्रह्मणा स्वयं
चेमचीर्णानि ब्रह्माणि तपसा च प्राप्तः परमं पदं ॥
भगवद्दतारहस्यषट्सहस्रश्रीऋषभचरित्रं समप्रमस्ति ॥
स्तुत्वा शत्रुंजयं तीर्थं नत्वा रैवतकाचलं ॥
स्नात्वा गजपथे कुंडे पुनर्जन्म न वेदयत् ॥

महाभारत—

पुनस्तत्रैव सर्वज्ञः ' सर्वदेवनमस्कृतः
छत्रत्रयातिसंयुक्तः ' पूज्यमूर्तिरसौ वहन् ॥
परमात्मानमात्मानं, लसत्केवलनिर्मलम् ।
निरंजनं निराकारं, ऋषभं तु महेद्वृषम् ॥

जैनजाति महोदय पान ५ यांत— श्री हरिदत्ताचार्य म्हणतात कीं,—" जैनधर्म नूतन नाहीं, परंतु वेदधर्माच्याही प्राचीन आहे. कारण, प्रथम तीर्थंकर वृषभ, नेमिनाथ आणि श्रीपार्श्वनाथ

यांचा उल्लेख आहे. ( वेदाची पहिली श्रुति प्रकरण १ पहा. ) पुढे म्हणतात,—वासुदेवानें नारदास प्रश्न केला कीं, खरी भक्ति कशी असावी. नारदानें वृषभपुत्राच्या ( भरताच्या ) नऊ परम भागवत पुत्रांची कथा सांगितली.

याप्रमाणें भगवान् वृषभदेवांचा उल्लेख या विश्वांतील वेद, पुराण, संहिता वगैरे सर्व ग्रंथामध्यें पाहण्यास मिळतो. यावरून श्री आदिनाथ भगवंत या कल्पातील आद्य तीर्थंकर आणि वैदिक धर्मापेक्षाही फार प्राचीन कालांतील होते हें स्पष्ट होतें. या वरूनच जैनधर्माची ही प्राचीनता सिद्ध होते. जैनधर्म नैसर्गिक धर्म असल्यामुळें जगाचें अस्तित्वाबरोबरच जैनधर्माचें अस्तित्व मानण्यास हरकत नाहीं. जग हें जसें अनादिकालीन आहे तसें धर्मही अनादिकालीनच आहे. धर्म म्हणजे वस्तुस्वभाव, धर्म म्हणजे कर्तव्य, धर्म म्हणजे आत्मविशुद्धि होय.

जैनधर्माचें अंतिमध्येय आत्मपरकल्याण आहे. आत्म-विशुद्धिशिवाय आत्मकल्याण होऊ शकत नाहीं. परिणाम शुद्धिशिवाय आत्मविशुद्धि होऊ शकत नाहीं, परिणाम शुद्धिकरितां देवपूजादि सत्कार्यें करण्याची आवश्यकता आहे. देवपूजा, गुरूपास्ति, स्वाध्याय, संयम, तप आणि दान प्रत्येक मनुष्याला आपल्या परिणामविशुद्धि करितां आवश्यक कार्यें आहेत. कर्मकलंकित भवरोगपीडित दीर्घसंसारी जीव या सत्कार्यांच्या अवलंबनानें मोक्षपथिक बनतो. तो जीव या संसारामध्यें सर्व अभ्युदयाचा उपभोग करून मोक्ष साम्राज्याचा अधिपति होतो.

म्हणून अभ्युदय आणि निःश्रेयसाच्या प्राप्तिकरितां देवपूजादि करणें आवश्यक आहे. देवपूजादि सत्कार्यांच्या निर्विघ्न सिद्धिकरिता जिनमंदिराची आवश्यकता आहे. सागार आणि अनगार या दोघांच्या ही हितसाधनाकरितां जिनमंदिर आणि जिनप्रतिमांची अत्यंत आवश्यकता आहे.

गृहस्थधर्म आणि मुनिधर्म ही जिनमंदिर व जिनप्रतिमा यांच्या अभावीं टिकणें शक्य नाहीं. जिनमंदिरें नसतीं तर इतर धर्मांचा प्रभाव पडून जैन समाज हा नाहींसा झाला असता. जैन समाजाचा उद्धार करण्याचें सामर्थ्य जिनमंदिरांत व प्रतिष्ठा करण्या मध्यें आहे.

राजानौ पूजया पुण्यं जिनस्य जितविद्विषौ ।
जिनाभावे जिनस्यैव प्रतिमापूजनं मतम् ॥
तस्यास्तु स्थितये सद्भिर्निर्माप्यं सौधमुन्नतम् ।
जिनसौधे सुधाधौते सातधर्माश्रयो भवेत् ॥
प्रासादाश्रयतः श्रव्यः श्रोतव्याः स वृषो बुधैः ।
योगीन्द्रा यत्र तिष्ठन्ति योगयोगांगपारगाः ॥
श्राद्धाः सच्छूद्धिसंशुद्धा दधते धर्मभावनाः ।
वरनार्यो वल्गन्त्यत्र यत्र गायन्ति सुस्वराः ॥
तत्र केचिच्च पूजाभिरुद्यापनशतैः परैः ।
चंद्रोपकादिदानेनोपार्जयन्ति वृषं परे ॥
प्रासादसृष्टितः श्रेयः परं श्रेयोर्थिनां नहि ।
अभूत्र भविता नास्ति स्वस्तिदायि सदा मुदा ॥

सुश्राद्धानां विशुद्धानां विधेयं जिनसद्मनः ।
निर्मापणं यतः श्रेयः स्यात्सदा भरतादिवत् ॥
तन्निशम्य निशानाथवदनौ सदनं गतौ ।
तौ दधाते धृतिं धर्मे धीधनौ वर्द्धितश्रियौ ॥
श्रीशुभचन्द्राचार्यविरचिते करकण्डूचरिते अष्टमाध्याये ।

नील आणि महानील हे दोन राजे तेरपुर येथें नेमिनाथस्वामीच्या काळीं राज्य करीत होते. एके दिवशीं उद्यानांत सुव्रत नामक मुनि आले व त्यांनीं त्यांना या प्रमाणें सांगितलें " हे राजानो, जिनेश्वराच्या पूजेनें पुण्यप्राप्ति होते. व जिनेश्वर जेव्हां विहार करीत नसतात त्या वेळीं जिनप्रतिमांचें पूजन करण्यानें पुण्य प्राप्ति होते. जिनप्रतिमा सुरक्षित राहावी म्हणून उत्तम व ऊंच असें जिनमंदिर बांधावें. जिनमंदिरामुळें सुख देणारा जैनधर्म ' यावच्चन्द्रदिवाकरौ ' भूतलावर नांदतो. जिनमंदिर असेल तर जैनधर्माचें आत्मोद्धारक स्वरूप ऐकावयास श्रावकांना मिळेल व ते स्वधर्मांत स्थिर राहतील अन्यथा राहणार नाहींत. याच प्रमाणें जिनमंदिरांत मुनि राहून ते धर्मध्यानानें स्वहित करतील व श्रावकांनाही आत्महिताचा मार्ग दाखवितील. जिनमंदिरामुळेंच श्रावकलोकांची धर्मभावना टिकवू शकतां येते. श्राविका तेथें जाऊन मधुर गायनांनी जिनाची स्तुति करतात. कित्येक श्रावक दररोज तेथें जिन पूजन करितात. कित्येक दशलक्षणादि व्रतें करून त्यांचीं उद्यापनें करितात व स्वतःला आणि इतर श्रावकांना धर्मांत स्थिर करितात. कोणी श्रावक छत्र, चामर,

चांदवा वगैरे धर्मोपकरणें देऊन धर्म साधन करितात. कल्याणाची इच्छा करणाऱ्या श्रावकांना जिनमंदिराहून वेगळें कल्याण साधन नाहीं. भरत चक्रवर्तीनें कैलास पर्वतावर आदिनाथ भगवान आदि चोवीस तीर्थंकरांचीं जिनमंदिरें बांधवून महाप्रतिष्ठा केल्या तेव्हां पासून जैनधर्म या उपायानें भारतवर्षांत नांदत आहे. यास्तव जिनमंदिर, प्रतिमास्थापन हीं कार्ये करून भरतचक्रवर्तीनें सर्व श्रावकांना जो धडा घालून दिला आहे, तो निःसंशय धर्मवर्धक व प्रशंसनीय आहे. या प्रमाणें नील महानीलांनीं धर्मस्वरूप ऐकून तेरपूरच्या जवळील पर्वतावर त्यांनी हजार खांबांचे मोठे लेणें बांधून त्यांत सुंदर जिनमूर्तिची स्थापना केली व फार मोठी धर्मप्रभावना केली.

या सर्व धर्मप्रभावनेच्या गोष्टी ध्यानांत घेऊन सोलापुर येथें श्रीमान् हरिभाई देवकरणांनीं शुक्रवारपेठेंत शंभर वर्षापूर्वी आदिनाथ प्रभूचें महा जिनमंदिर बांधवून भव्य श्रावक, मुनि, आर्यिका व श्राविका यांना धर्मार्जनाचें कायम टिकणारें स्थान करून ठेविलें. हें अत्यंत प्रशंसनीय कार्य त्यांनीं केलें आहे. तेव्हां पासून येथील सर्व जातीच्या श्रावकांची धर्मोन्नति झाली आहे. त्यांचें मिथ्याधर्मावरील श्रद्धान नष्ट झालें. आपलें जैनत्व कळून आलें आणि त्यामुळें आत्महिताचा मार्ग स्वीकारून ते आपल्या मुला बाळांना आणि स्वकीय, स्वजातीयांना धर्मतत्पर करूं लागले. सर्वांच्या पुण्यार्जनांना श्रीहरिभाई देवकरण हें कारण आहेत, म्हणून त्यांची प्रशंसा करावी तेवढी थोडीच आहे.

## श्रीआदिनाथ जैन मंदिर प्रतिष्ठाकाल.

सोलापुर शहर हें दक्षिण प्रांतांतील जैनांचें विशेषतः हुमड समाजाचें माहेर घर असून महाराष्ट्र कर्नाटक आणि निजाम इलाख्याच्या सीमेवरील सर्वांत मोठें शहर आहे. मुंबई प्रांतांत मुंबई सोडल्यास प्रमाणाच्या मानानें ३ रें नंबरचें आणि व्यापारांच्या दृष्टीनें दुसरे नंबरचें शहर मानलें जात आहे. एक सुधारलेल्या शहरास हवी असलेलीं सर्व साधनें सोलापुरास ही प्राप्त आहेत आणि कित्येक गिरण्यांच्या अस्तित्वानें येथे गिरणी व हातमाग कापडाचें उत्पादन व विक्री मोठ्या प्रमाणांत होत आहे आणि हिंदुस्तानामध्यें येथील कापड सर्वत्र प्रसिद्ध आहे.

येथें जैन समाजाचें वास्तव्य फार प्राचीन कालापासून असून हुमड दिगंबर जैन सुमारे २५०–३०० वर्षांपासून गुजरात मधील निरनिराळ्या मार्गांतून आले आणि येथें त्यांचें वास्तव्य झालें नि ते निरनिराळे धंद्यामध्यें प्रविष्ट होऊन त्यामध्यें यशःसंपादन करू लागले.

त्यावेळीं येथील जैनसमाजाची स्थिति विशेष ऊर्जितावस्थेमध्यें नव्हती. तथापि सर्व भद्र पुरुष सत्कार्यामध्यें रत होते. अनिश्चित कालापासून म्हणजे सुमारे १२५ वर्षांपूर्वीपासूनच येथें दोन दिगंबर जैन मंदिरें होतीं. तीं मंदिरें म्हणजे आज आम्हां सर्वांना दृष्टि गोचर होत असलेलें भुसार पेठेंतील श्री चिन्तामणि पार्श्वनाथ मंदिर आणि दुसरें कसबा पेठेंतील पार्श्वनाथ

मंदिर हें होय. दोन्ही मंदिरें पार्श्वनाथ स्वामींचेच होतीं अर्थात् दोन्ही मंदिरामध्ये मूलनायक श्रीपार्श्वनाथ होते. त्यावेळचे कांहीं इतिहासकार ही जैनधर्माच्या प्राचीनत्वाचें अध्ययन नीट न झाल्यामुळे महावीरपर्यंत आणि फार प्रयत्न केला तर पार्श्वनाथापर्यंत जैन धर्माचे संबंध जोडून गलत करीत होते, आणि दिवसें दिवस हुमड समाजाची वस्ती झपाट्यानें धन जन, कलकानें वाढू लागली. आणि त्यांची भरभराट ही झाली. व व्यापार क्षेत्रामध्ये ही त्यांनीं प्रमुख स्थान मिळविलें म्हणून त्यांनीं वरील ऐतिहासिक भ्रमनिरसन करणें करितां कीं काय किंवा इतर धर्मियां प्रमाणे आपल्या ऐश्वर्याला साजेल असें आपले मंदिर नांहीं या विचारानें कीं काय, एक भव्य, विशाल व सुंदर आदिनाथ जिनमंदिर निर्माण करण्याचा विचार केला. अस्तित्वांत असलेलीं दोन्ही मंदिरें त्यावेळच्या समाजाच्या भक्तिभावनेच्या दृष्टीनें अपूरीं पडत होतीं. जागा भक्तांच्या विपुल संख्येच्या मानाने अत्यंत कमी पडत होती. आणि भाद्रपद अष्टान्हिकादि पर्वे समयामध्ये तर विशेष संकोचाचा अनुभव येत होता म्हणून ही एक नवीन मंदिराची आवश्यकता त्यावेळीं भासत होती. या सर्व कारणांनीं मंदिरनिर्माण त्यावेळीं हा जैन समाजापुढें विचारणीय प्रश्न उभा राहिला.

त्यावेळचे हुमड समाजांतील प्रमुख आणि नगरशेठ सुप्रसिद्ध शेठ हरीभाई देवकरण गांधी यांच्या मनांत ही हे विषय रात्रंदिन घोळत होते आणि दक्षिण आणि उत्तर प्रांतांत कलेच्या दृष्टीनें अत्यंत दर्शनीय आणि श्रेष्ठ जिनमंदिराचे निर्माण करण्याची भावना

उत्पन्न झाली. त्यावेळी त्यांचे बंधु शेठ नथूराम देवकरण यांनीं या शुभ कार्यामध्ये सम्मति सहयोग प्रदान करून त्यांचे कार्यामध्ये विशिष्ट उत्साह निर्माण केला. आणि उभय बंधूंनीं मिळून मनोगत सातिशय पुण्यवर्धक भावनेची पूर्ति केली.

त्यांनीं सध्या मंदिर असलेली शुक्रवार पेठेंतील जागा संवत् १९०३ मध्ये खरेदी करून त्यावर सुंदर, भव्य, विशाल आणि शिखरबद्ध जिनमंदिराचे निर्माण केलें. आणि त्या मध्यें सं. १९०५ माघवद्य पंचमीच्या शुभ दिवशीं श्रीदेवाधिदेव आदिनाथ यांची मूर्ति मोठ्या वैभवाने पंचकल्याणिक विधिपूर्वक प्रतिष्ठित करून स्थापना केली. त्या वेळच्या परिस्थितीकडे दृष्टिक्षेप केल्यास सहज समजून येईल कीं जिन मंदिरनिर्माण, जिन प्रतिष्ठामहोत्सव, आणि जैन रथयात्रा महोत्सव आदि कार्यें फार सुलभ नव्हतीं, दुष्कर होतीं. ' श्रेयांसि बहुविघ्नानि, नीतिचें मूर्त स्वरूप इतस्ततः पाहण्यास मिळत होतें. अर्थात् या पुण्यायतनाच्या निर्मितिच्या वेळीं सुद्धां वरील प्रतिष्ठापकांना किती विरोध दुःखें सहन करावी लागली असतील हें पाठकांनीच कल्पना करून घेणें बरें. तथापि सर्व विघ्न–विरोधांना तोंड देऊन आपल्या मनाच्या उत्कट व शुभभावनेस सिद्धीस नेण्याचे कार्यी श्री धर्मनिष्ठ शेठ हरीभाई देवकरण यांनी मूर्तिमंत उज्ज्वल यशाचें संपादन केलें, जें आज घटकेपर्यंत येथील शुक्रवार पेठ येथें आम्हास दृग्गोचर होत आहे.

या जिनमंदिराच्या निर्मितिकालासंबंधी उल्लेख सदर मंदिरामध्ये असलेल्या खालील लेखामध्यें उपलब्ध आहे.

( वंशपरिचय—सेठ हरीभाई देवकरण गांधी )
आखराज
गुलाबचंद आखराज
माणिकचंद गुलाबचंद
( देवकरण माणिकचंद
पुंजिराम माणिकचंद
वेणिचंद माणिकचंद )
( केवलचंद, नाथाभाई, हरिचंद, मुळचंद )
( खुशालचंद )
( शामचंद, शगालचंद, परमचंद, राजकरण, दलुचंद)
(नानचंद) (धरमचंद) (रामचंद) (वरखचंद)
(जैचंद, हिराचंद ) (रामचंद) (हिराचंद) (रखचंद) (पानाचंद, वीरचंद) (मोतीचंद, फूलचंद)
( रावजी, वालचंद, हिराचंद फूलचंद )
(फतेचंद)
(माणिकचंद, मलुकचंद)
( उगरचंद) ( रावजी ) (धरमचंद)
(जिवराज, चंदुलाल) (गुलाबचंद, नवलचंद) (माणिकचंद, नानचंद, मोतीचंद) ( लीलाचंद ) (मोतीचंद, उगरचंद) (नेमचंद, नानचंद)
( रतनचंद, रविकिरण ) ( अरविंद )
(गुलाबचंद)
(अतुल, अरुण)

## १ श्रीआदिनाथ मंदिर गर्भगृहांतील शिलालेख.

स्वस्तिश्री संवत् १९०५ वर्षे माघ वद्य ५ ( पंचमी ) चंद्रे श्रीमूलसंघे सरस्वतीगच्छे बलात्कारगणे श्रीकुंदकुंदाचार्यान्वये भट्टारकश्रीसकलकीर्तिदेवास्तत्पट्टे भट्टारकश्री भुवनकीर्तिदेवास्तत्पट्टे भट्टारकश्री ज्ञानभूषणस्तत्पट्टे भट्टारकश्रीविजयकीर्तिस्तत्पट्टे भट्टारक श्रीशुभचंद्रस्तत्पट्टे भट्टारकश्रीसुमतिकीर्तिस्तत्पट्टे भट्टारकश्रीगुण-कीर्तिस्तत्पट्टे भट्टारकश्रीवादिभूषणस्तत्पट्टे भट्टारकश्रीरामकीर्तिस्तत्पट्टे भट्टारकश्रीपद्मनंदिस्तत्पट्टे भट्टारकश्रीदेवेंद्रकीर्तिस्तत्पट्टे भट्टारक श्रीक्षेमकीर्तिस्तत्पट्टे भट्टारकश्रीनरेंद्रकीर्तिस्तत्पट्टे भट्टारकश्री विजयकीर्तिस्तत्पट्टे भट्टारकश्रीनेमिचंद्रस्तत्पट्टे भट्टारकश्रीचंद्र-कीर्तिस्तत्पट्टे भट्टारकश्रीरामकीर्तिस्तत्पट्टे भट्टारकश्रीयशःकीर्तिस्तत्पट्टे भट्टारकश्रीसुरेंद्रकीर्तिगुरूपदेशात् हुंबडज्ञातीलघुशाखायां उत्त-रेश्वर गोत्रे गाम जादरना गांधी देवकरण भार्या जेठी तत्पुत्रौ द्वौ तत्प्रथमपुत्र गांधि नाथुराम भार्या संतोषा द्वितीयपुत्र हरीचंद्र भार्या केशरी एतत्पुत्र रामचंद्र नाम तनयेन श्री वृषभदेव स्वामिनः शिखरबद्धप्रासाद कारापितं । १ ।। इति शुभं ।

२ श्री आदिनाथ महाराज याच्या उजव्या बाजूस श्वेतवर्ण श्रीआदिनाथ महाराज—प्रथम तीर्थंकर.

३ श्री आदिनाथाच्या वामभागीं श्वेतवर्ण श्रीचंद्रप्रभ स्वामी—आठवे तीर्थंकर.

४ श्री आदिनाथाच्या उजव्या बाजूस दक्षिणमुखी श्वेतवर्ण चें लांछन पितळेच्या सिंहासनें खाली झाकलेलें असल्या-मुळें नांव लिहिलें नाहीं.

श्रींच्या डाव्या बाजूस उत्तरमुखी श्यामवर्ण श्रीपार्श्वजिनाची मूर्ति–२३ वें तीर्थंकर.

## श्रींच्या गर्भगृहांतील टिप्पण

६ श्रींच्या उजव्या बाजूस श्रीपद्मावति देवीची मूर्ति श्वेतवर्ण.

७ श्रींच्या डाव्या बाजूस श्रीपद्मावति देवीची मूर्ति श्वेतवर्ण.

८ श्रींच्या समोरील मूर्ति श्वेतवर्ण श्री आदिनाथ महाराज यांच्या प्रतिष्ठेच्या वेळीं कल्याणिक मूर्ति श्री आदिजिनाची.

श्रींच्या गर्भगृहांत स्थापन केलेले क्रमांक दोन पासून आठ पर्यंत असलेल्या जिनबिंबाची प्रतिष्ठापूर्वक स्थापना गांधी नाथूराम देवकरण व हरीचंद देवकरण यांनींच केलेली आहे.

श्री आदिनाथ महाराज यांच्या गर्भगृहाच्या दरवाजावरील शिलालेखांत व श्रींच्या देवळावरील भव्यशिखरावरील सुवर्णमय कलशावर ( श्री वृषभजिनाचें खालील आसनावर जो नामोल्लेख केलेला आहे त्याप्रमाणेंच ) प्रतिष्ठाकारांचें नांव कोरलेलें आहे.

या प्रमाणें शेठ हरीभाई देवकरण यांनीं आपले बंधु नथूराम देवकरण आणि पुत्र रामचंद हरीभाई यांच्या सहयोगानें सोलापुर येथें रमणीय भव्य जिनमंदिर निर्माण करून ठेविलें.

या शिवाय हरीभाई देवकरण यांनीं भारतवर्षांतील निर-निराळ्या ठिकाणीं दान धर्म करून लोकोपयोगी कार्य केलें आहे. या घराण्यांतील सर्व प्रमुख व्यक्तींनीं आपल्या घरण्यांतील परंपरा शेठ हरीभाई देवकरण यांच्या नांवानें अव्याहत चालू ठेवली आहे.

कलकत्ता येथील भारतीय जैन सिद्धांत प्रकाशिनी संस्थेस पंधरा हजाराचे वृहद्दान देऊन संस्थापक व संरक्षक झाले. या संस्थेतून त्यावेळीं अनेक उत्तम ग्रंथांचे प्रकाशन झालें. या कामीं या घराण्यांतील श्री शेठ हीराचंद गांधी, शेठ वालचंद रामचंद गांधी आणि शेठ फूलचंद रामचंद यांनीं आपल्या घराण्यास साजेल त्या प्रमाणें औदार्य व्यक्त केलें. प्रसिद्ध न्यायग्रंथ प्रमेयकमलमार्तंण्डाचे प्रकाशनचे श्रेय या घराण्यांकडेच आहे.

मोरेना येथील गोपाल दि. जैन सिद्धांतविद्यालयास अडतीस हजारचें बृहद्दान केलें असून दरमहा २००) प्रमाणें सुमारे पंधरा सोळा वर्षपर्यंत अखंड सहायता देऊन सुमारे चाळीस हजारांची मदत केली आणि संस्कृत शिक्षणाबद्दल आपलें प्रेम व्यक्त केलें.

साहित्य प्रकाशन, व धार्मिक शिक्षणाकडे ज्याप्रमाणें या घराण्याचा ओढा होता त्याच प्रमाणें लौकिक शिक्षणाकडे ही यांची अभिरुचि होती.

सोलापुर येथील हरीभाई देवकरण हायस्कूल या संस्थेस सुमारे ३७०००) सदतीस हजार रुपये दिले असून त्या संस्थेत दरवर्षी कमीत कमी २० गरीब जैन विद्यार्थ्यांना अनपेड भर्ती करण्याची कायमची सोय करून ठेवली आहे.

या शिवाय कर्वे आश्रम पुणें, इतिहास संशोधन मंडल पुणें, डी. ए. वी. कालेज सोलापुर, शिक्षण प्रसारक मंडळ पुणे, धवल ग्रंथ प्रकाशन, स्याद्वाद महाविद्यालय बनारस, ऐ. प. पाठशाला सोलापुर जैन गुरुकुल वगैरे विभिन्न संस्थांना वेळोवेळीं मदत करून, साहित्यिक, शैक्षणिक, सांस्कृतिक आणि सार्वजनिक क्षेत्रामध्यें मोठी कामगिरी बजावली आहे.

या घराण्यामध्ये ज्याप्रमाणें पुरुषांची प्रवृत्ति धर्मकार्याकडे विशेषतः होती, त्याच प्रमाणें स्त्रियांची प्रवृत्ति ही अनुकूलतेनें चालू असे. त्यांनीं पुरुषाप्रमाणेंच सर्व कार्यामध्ये अनुकूल भावना व्यक्त करून परंपरेनें धार्मिक प्रवृत्ति टिकविण्यास मोठी मदत केली.

सदरहु घराण्यांतील शेठ रामचंद हरीचंद यांना दोन कुटुंबें होतीं. त्यावेळी द्विभार्याप्रतिबंधक बिल भारतवर्षांत कोठें ही अमलांत नव्हते. सौ. रतनबाई व सौ. मैनाबाई ह्या उभय सती परम धार्मिक होत्या. सौ. रतनबाई यांना रावसाहेब नांवाचा पुत्र होता. रावसाहेब हे दीर्घायुष्याचे अभावी तरुणपणीच वियुक्त झाले. अल्पकालांत जरी यांनी इहलोक यात्रा संपविली तरी त्यांनी येथील आदिनाथ मंदिराची व्यवस्था, प्रबंध आणि स्थायित्वाकडे अटोकाट प्रयत्न केला. आणि जिनमंदिराची स्थावर इस्टेट वाढविण्यामध्ये त्यांचे श्रम आणि कर्तव्यतत्परता विशेष उल्लेखनीय आहेत.

सौ मैनाबाईस वालचंद रामचंद, हीराचंद रामचंद, आणि फूलचंद रामचंद हे तीन पुत्र होते ज्यांनीं या घराण्याच्या उज्ज्वल कीर्तिमध्ये भर घातली आहे.

श्रीरतनबाईंना पुत्र वियोगाचें दुःख जरी प्राप्त झालें तरी निराश न होता सदा धर्माचरण तीर्थयात्रा, स्वाध्याय, जिनायतन-निर्माण, धर्मशाळानिर्माण आदि कार्यामध्यें सदा आपला वेळ घालवून समाज आणि धर्मसेविकेचें कार्य त्यांनीं बजावलें. उत्तर हिंदुस्तानांतील सिद्धक्षेत्रांची यात्रा बरेच वेळा त्यांनीं केल्या आहेत. आणि बरेच ठिकाणीं श्रीहरीभाई देवकरण या नांवानें दान करून त्यांनीं जिनमंदिर जैन धर्मशाळा, जैन बोर्डिंग, पंच-कल्याणिक प्रतिष्ठा, आदि सत्कार्यें केली आहेत. या शिवाय इतर अनेक लोकोपयोगी कार्यें केलीं आहेत. मैनाबाईच्या नावानें पुणे येथें एक जैन बोर्डिंग चालत होतें.

या घराण्यांतील महनीय व्यक्ति केवळ सोलापुर येथेच जिन-मंदिर निर्माण करून संतुष्ट झाल्या. नाहींत. अपितु सिद्धक्षेत्र कुंथलगिरी, मांगीतुंगी, पालीठाना, तीर्थराज सम्मेदशिखर, वगैरे तीर्थांच्या ठिकाणीं जिनमंदिरें, धर्मशाळा आदींचें निर्माण करून मोठ्या वैभवानें प्रतिष्ठा केली. आणि असंख्य भव्यांना दर्शन पूज-नादिकाकरितां साधनें उपस्थित करून ठेविलीं. पुणें येथील वेताळ पेठेंत चंद्रप्रभ दि. जैन मंदिराचें निर्माण करून मोठ्या थाटानें प्रतिष्ठा केली आणि पुणें येथें धर्मप्रभावनेकरितां मोठी मदत केली.

सोलापुर येथील चतुर्विध दानशाळेस एक बृहद्दान देऊन चतुर्विध दानाचें आदर्शकार्य प्रस्थापित करण्याचें कामीं मोठी सहायता या घराण्यांतील बंधुत्रयांनीं केली.

या शिवाय पुष्कळशा लोकोपयोगी कार्यामध्यें मुक्तहस्तानें दान देऊन यांनी आपलें औदार्य आणि आदर्श व्यक्तिमत्त्व व्यक्त केलें आहे.

शेठ वालचंद रामचंद धार्मिक आणि सामाजिक कार्यामध्यें विशेष लक्ष्य घालीत होते तर शेठ हीराचंद रामचंद विविध लोक कार्यामध्यें भाग घेत होते. हीराचंद रामचंद सोलापुर येथें 'हिराकाका' या नांवानें प्रसिद्ध होते. सर्व त्यांना काका या आदरार्थी संज्ञेनें ओळखीत असत. त्यांची प्रवृत्ति प्रारंभापासूनच धार्मिक क्षेत्राप्रमाणेंच राष्ट्रीय क्षेत्राकडेही होती. सन् १९०२ मध्यें प्रांतीय कांग्रेस कमेटीची बैठक सोलापुर येथें भरली होती त्याचें बरेंच श्रेय श्रीकाका यांना देणें योग्य होईल.

शेठ हिराचंद रामचंद आणि वालचंद रामचंद यांचा ओढा शिक्षणप्रसाराकडे विशेषतः होता. शिक्षण प्रसारानेंच समाजामध्यें जागृति होईल ही जाणीव ठेऊन त्यांनी लाखों रुपये या कार्या-कडे खर्च केले व या पवित्रकार्याचा आदर्श उपस्थित केला. या प्रमाणें उभय बंधूनीं आपलें जीवन सफल करून आपल्या घरा-ण्याचें यश दिगंतव्यापी होईल त्याप्रमाणें सर्व क्षेत्रामध्यें कार्य केलें.

यांचे व्यापारक्षेत्र सोलापुर, मुंबई, पुणें, नवानगर, गुल-बर्गा, विजापुर, कलकत्ता, बार्शी आणि लातूरमध्यें होतें. यांनी न्याय्य मार्गानें व्यापार करून विपुलसंपत्ति मिळविली. सोलापुर येथें नगरशेठ किंवा एका राजाला साजेल अशा पद्धतीचा प्रासाद यांनी सन् १९१२ सालीं बांधविला. या प्रासादाचा उप-योग ही पुष्कळ वेळा सभा, समारंभ कीर्तन वगैरे सार्वजनिक कार्याकडे होतो हें नमूद करण्यास हरकत नांहीं.

## वर्तमान-परिचय.

या घराण्यामध्ये हल्ली शेठ वालचंद रामचंद यांचे चि. शेठ जीवराज वालचंद, चंदुलाल वालचंद, सेठ हिराचंद रामचंद यांचे चि. गुलाबचंद हिराचंद आणि नवलचंद हिराचंद आणि शेठ फूलचंद रामचंद यांचे चि. माणिकचंद फूलचंद, नानचंद फूलचंद, मोतीचंद फूलचंद आहेत. श्री चंदुलाल वालचंद हे ग्रेज्युएट असून व्यापारा-निमित्त जापानलाही जाऊन आले आहेत.

श्री शेठ जीवराज वालचंद गांधी हे हल्ली आदिनाथ दि. जैन मंदिराची व्यवस्था पाहत असून ते पंचायतीचे शेठ आहेत. त्यांची धार्मिक, सामाजिक कार्याप्रमाणे सार्वजनिक आणि राष्ट्रीय कार्यांमध्ये ही अभिरुचि आहे. सन १९३७, १९३८ आणि १९३९ या कांग्रेस मिनिस्टरीच्या अवधींत सोलापुर शहर कांग्रेस-कमेटीचे शेठ जीवराजभाई अध्यक्ष होते आणि त्यावेळीं सोलापुरांत आलेले सध्याचे गवर्नर जनरल ना. राजाजी, सरदार पटेल, महात्मा गांधी, पं. नेहरू आदि देशाच्या थोर पुढाऱ्यानीं यांचे कडेच उतरून आतिथ्य स्वीकारलें होतें. आज ज्या मंदिराचा शतसांवत्सरिक महोत्सव साजरा होत आहे, त्याची उत्पत्ति, समृद्धि, संरक्षणाच्या कामीं यांच्या पूर्वजांनीं वेळोवेळीं आपल्या दुकानांतील नफ्याच्या-भागांतून मोठमोठाल्या रकमा देऊन स्पृहणीय सहायता केली आणि आजचा प्रसंग सर्वांना पाहण्याची संधि दिली. त्या स्मृतीस जागृत ठेवण्या करितां शेठ जीवराज वालचंद गांधी यांनीं आज शत सांवत्सरिक महोत्सव प्रसंगीं स्वयंस्फूर्तिने आदिनाथ पंचकल्याणिक प्रतिष्ठा महोत्सव करण्याचे तुत्स्य कार्य केलें आहे.

शेठ हरीभाई देवकरण यांच्या घराण्याची स्तुति करण्या करितां येथें हें प्रकरण लिहिलें नसून मनुष्यजन्मामध्यें येऊन उत्तमकुल प्राप्त झाल्यावर सर्व जीवांनी आपले जीवन अनुकरणीय कसें करावें याचा बोध व्हावा म्हणून येथें हा सर्व विषय मुद्दाम नमूद केला आहे.

या प्रमाणें सं. १९०१ मध्यें श्री आदिनाथ दि० जैन मंदिराची स्थापना झाली.

गाभाऱ्यांतील मूर्तिची स्थापना अत्यंत नयनरम्य, मनोवेधक व आल्हाददायक अशी करण्यांत आली आहे. मध्यभागीं मूलनायक आदिपरमेश्वराची कृष्णवर्णीय भव्य व मनोहर प्रतिमा आहे. उजवे बाजूस श्रीआदिनाथ तीर्थंकरांची श्वेतवर्णीय प्रतिमा आणि डावे बाजूस श्री चंद्रप्रभ तीर्थंकरांची श्वेतप्रतिमा, तिचे बाजूस श्री हरीचंद प्रेमचंद यांनी बसविलेली उत्तरमुखी श्यामवर्णीय श्री पार्श्वनाथ तीर्थंकरांची प्रतिमा, तिचे शेजारीच श्री पद्मावती मातेची प्रतिमा, दक्षिणमुखी श्वेतवर्ण प्रतिमा व तिचे शेजारी श्री पद्मावती मातेची प्रतिमा तसेच मूलनायकाचे पुढे आदिनाथ तीर्थंकराची श्वेतवर्ण लहान प्रतिमा अशी वेदीवर सुंदर मांडणी केली आहे.

## भुयारातील प्रतिष्ठा सं. १९०५

या मंदिरांत असलेल्या भुयारातील श्री पार्श्वनाथ भगवंताच्या विशाल प्रतिमेची स्थापना सं. १९०५ मध्ये म्हणजे मूल मंदिराच्या प्रतिष्ठेच्या वेळीच झाली आहे. ही प्रतिष्ठा भट्टारक

श्री सुरेंद्रकीर्ति यांच्या उपदेशानें गुजरात मधील टाकाटूका निवासी हुम्मड जातीय लघुशाखा उत्तरेश्वर गोत्रामध्यें उत्पन्न झालेले गांधी हेमचंद दलजी आणि त्यांचे पुत्र रामचंद हेमचंद यांनीं प्रतिष्ठा करविली. या प्रतिष्ठेस ही आज शंभर वर्षें पूर्ण होतात.

या बद्दल भुयारांतील पार्श्वनाथ जिनबिंबाखालील लेख प्रमाणभूत आहे. त्या लेखाचें उद्धरण या प्रमाणें आहे.

## १ स्वस्तिश्री संवत् १९०५ माघ कृष्ण ५ पंचमी

श्री मूलसंघे सरस्वतीगच्छे बलात्कारगणे श्रीकुंदकुंदाचार्यान्वये भट्टारकश्रीसकलकीर्तिदेवास्तत्पट्टे भट्टारकश्रीभुवनकीर्तिदेवास्तत्पट्टे भट्टारकश्रीज्ञानभूषणदेवास्तत्पट्टे भट्टारकश्रीविजयकीर्तिदेवास्तत्पट्टे भट्टारकश्रीशुभचंद्रदेवास्तत्पट्टे भट्टारक श्रीसुमतिकीर्तिदेवास्तत्पट्टे भट्टारकश्रीगुणकीर्तिदेवास्तत्पट्टे भट्टारक श्रीवादिभूषणदेवास्तत्पट्टे भट्टारकश्रीरामकीर्तिदेवास्तत्पट्टे भट्टारक श्रीपद्मनंदिदेवास्तत्पट्टे भट्टारकश्रीदेवेंद्रकीर्तिदेवास्तत्पट्टे भट्टारकश्रीक्षेमकीर्तिदेवास्तत्पट्टे भट्टारकश्रीनरेंद्रकीर्तिदेवास्तत्पट्टे भट्टारक श्रीविजयकीर्ति देवास्तत्पट्टे भट्टारक श्रीनेमिचंद्र देवास्तत्पट्टे भट्टारकश्रीचंद्रकीर्तिदेवास्तत्पट्टे भट्टारकश्रीरामकीर्तिदेवास्तत्पट्टे भट्टारकश्रीयशःकीर्तिदेवास्तत्पट्टे भट्टारकश्रीसुरेंद्रकीर्ति गुरोरुपदेशात् हुंबडज्ञातीयलघुशाखायां उत्तरेश्वरगोत्रे गांधी हेमचंद दलजी भार्या झुमा तत्पुत्र रामचंद गुजरातमध्यें गाम टाकाटूका श्रीपार्श्वनाथचरणे नित्यं प्रणमंति । श्रीरस्तु ।

। शुभं ।

उतारा

वरील लेखामध्ये उल्लेखलेल्या श्रीहेमचंद दलजी यांचा वंशक्रम याप्रमाणें आहे.

हेमचंद दलजी.

परमचंद हेमचंद — रामचंद हेमचंद — मलुकचंद हेमचंद

रामचंद हेमचंद → जेठीराम रामचंद → अमीचंद जेठीराम.

याप्रमाणें हल्ली श्रीशेठ अमीचंद जेठीराम या वंशाचे चालक हयात आहेत.

या वंशजांनीं सोलापुर येथील भुसार पेठेंतील चिंतामणि पार्श्वनाथ जिनमंदिर बांधविलें असून तें मंदिर सोलापुरांत सर्व प्राचीन आहे आणि आज पर्यंत त्यामंदिरामध्यें होत असलेल्या पूजा प्रभावनेची सर्व व्यवस्था श्रीअमीचंद जेठीराम हे पाहत आहेत. ह्या मंदिराची पूजा अर्चा व प्रबंध व्यवस्था आदि विशेषतः आज पंचम जैन समाजाकडे जरी असली तरी श्री शेठ अमीचंद जेठीराम हे ही भक्तिनें वेळोवेळी त्यामध्यें मदत करतात. याप्रमाणें त्यांनीं आपल्या पूर्वजांची परंपरा चालू ठेवली आहे.

याशिवाय अक्कलकोट येथें ही ह्या वंशजांनीं एक मंदिर प्रतिष्ठा केली असून इतर तीर्थांच्या ठिकाणीं ही प्रतिष्ठा, धर्मशाला वगैरेंचे निर्माण केलें आहे.

## तीन कमानीचा मंडप सं. १९०९

या नंतर सं. १९०९ मध्यें श्रींचें गाभान्यांच्या समोरील तीन कमानीचा दगडी मंडप श्री केशव प्रेमचंद, खुशालचंद प्रेमचंद आणि दलुचंद खुशालचंद यांनी बांधविला.

हे केशव प्रेमचंद, खुशालचंद प्रेमचंद वगैरे गुजरात मधील बिलासणा गांवचे राहणारे आहेत.

याबद्दल शिलालेख मध्यें खालील प्रमाणें उल्लेख आहे.

श्रीआदिनाथ महाराज यांच्या समोरील दगडी मंडपाच्या पहिल्या मध्य कमानीवर जो शिलालेख कोरलेला आहे त्याचा अस्सल उतारा खालील प्रमाणें:—

१ स्वस्तिश्री संवत् १९०९ शके १७ प्रवर्तमानें शुभे फाल्गुण मासे शुक्लपक्षे तृतियायां तिथौ शनौ श्रीमूलसंघे सरस्वतीगच्छे बलत्कारगणे श्रीकुंदकुंदाचार्यान्वये भट्टारकश्रीसकलकीर्तिदेवास्तत्पट्टे श्रीभुवनकीर्तिस्तत्पट्टे भट्टारकश्रीज्ञानभूषणस्तत्पट्टे भट्टारकश्रीविजयकीर्तिस्तत्पट्टे भट्टारकश्रीशुभचंद्रस्तत्पट्टे भट्टारकश्रीसुमतिकीर्तिदेवास्तत्पट्टे भट्टारकश्रीगुणकीर्तिदेवास्तत्पट्टे भट्टारकश्रीवादिभूषणदेवास्तत्पट्टे भट्टारकश्रीरामकीर्तिदेवास्तत्पट्टे भट्टारकश्रीपद्मनंदिदेवास्तत्पट्टे भट्टारकश्रीदेवेंद्रकीर्तिदेवास्तत्पट्टे भट्टारकश्रीक्षेमकीर्तिदेवास्तत्पट्टे भट्टारकश्रीनरेंद्रकीर्तिदेवास्तत्पट्टे भट्टारकश्रीविजयकीर्तिदेवास्तत्पट्टे भट्टारकश्रीनेमिचंद्र

देवास्तत्पट्टे भट्टारकश्रीचंद्रकीर्तिदेवास्तत्पट्टे भट्टारकश्रीरामकीर्ति देवास्तत्पट्टे भट्टारकश्रीयशःकीर्तिदेवास्तत्पट्टे भट्टारकश्रीसुरेंद्रकीर्तिगुरोरुप देशात् सोलापुरनगरे हुंबडज्ञातीय लघुशाखायां मंत्रेश्वर गोत्रे गुजरातमध्ये गाम बिलासणा नामे मलुकचंद मनसाराम भार्या सांकली दक्षिणमध्ये केशव तथा शा. खुशाल प्रेमचंद तत्पुत्र दलचंद स्वतमयोग दक्षिणमध्ये गाम सोलापूर।

श्रीशांतिरस्तु शिवमस्तु जयोस्तु नित्यं।
आरोग्यमस्तु तव पुष्टिसमृद्धिरस्तु।
कल्याणस्तु सुखमस्त्वभिवृद्धिरस्तु।
दीर्घायुरस्तु सुखमस्तु जयोऽस्तु नित्यं। १।

तसेंच त्यापुढील चौहो बाजूनीं कमानी असलेला मनोहर व भव्य असा शिल्प कलायुक्त दगडी सभामंडप सोलापुर निवासी श्रीहरीचंद प्रेमचंद यांनी बांधविला. हे गुजरात मधील वाकानेर गांवचे राहणारे होते. ते सोलापुरला व्यापार निमित्तानें आले आणि येथें उत्तमरीतिनें व्यापारादिक करून त्यांनी न्यायोपार्जित संपत्तीचा धर्मकार्याकडे विनियोग केला. यांच्या धार्मिक परंपरेमध्येच अलीकडील लोकांना परिचित असलेले श्री शेठ हिराचंद अमीचंद शाह आणि माणिकचंद अमीचंद शाह (बी. ए.) हे झाले. खरोखर हे दोघेही बंधु या वंशामध्यें हिरा-माणिक प्रमाणें चमकून गेले.

या वंशजांनी चंपापुरी येथें शिखरबद्ध देवस्थान बांधविलें आणि प्रतिष्ठा केली तारंगासिद्धक्षेत्रा मध्ये श्री शेठ अमीचंद

तलकचंद शाह यांनीं एक देवस्थान बांधविले आणि एका मंदिराचा जीर्णोद्धार केला.

श्री शेठ हिराचंद अमीचंद व माणिकचंद अमीचंद, हे दोघे ही बंधु अत्यंत सरळ परिणामी, सुशिक्षित, सुसंस्कृत आणि धर्मप्रेमी व सदाचरण संपन्न होते. शेठ हिराचंद अमीचंद यांनीं दान धर्माशिवाय साहित्यिक क्षेत्रामध्ये ही आपली सेवा अर्पिली आहे. यशोधरचरित्र, गजकुमार चरित्र व जैन कथासुमनावलि नामक तीन ग्रंथ त्यांच्या लेखणीने लिहिले गेले असून, अत्यंत सुंदर व पठणीय असे आहेत. मोक्षमार्गप्रकाश ह्या ग्रंथाचे भाषांतर त्यांनी केले असून तो ग्रंथ अप्रकाशित आहे.

त्यांनी आचार्य शांतिसागर जिनवाणीजीर्णोद्धारक संस्थेस २१००) ची सहायता दिली असून उभय बंधूंनी येथील चतु-र्विध दानशाळेच्या ध्रुवफंडमध्ये रु ६३००) चे बृहद्दान केले आहे. ते कांही दिवस गजपंथ सिद्धक्षेत्र कमेटीचे व्यवस्थापक होते.

या उभय बंधूंचे प्रेम रामलक्ष्मणासारखें अव्याहत चालू होते आणि त्यांच्या संततीमध्येही तसेच चालू आहे. उभय बंधूंचा व्यापार एकत्र माणिकचंद हिराचंद शाह या नावाने चालू आहे. श्री केशरियाजी क्षेत्रास यांनी अत्यंत औदार्याने १६००० रु. चे बृहद्दान दिले आहे.

श्री माणिकचंद अमीचंद शाह हे ही अत्यंत शांतपरिणामी, सुविद्य आणि भद्र होते. पाश्चात्य शिक्षणामध्ये ग्रॅज्युएट असून ही

धर्मकार्यामध्ये आणि व्रत उपवासादिक संयमाकडे त्यांची निष्ठा प्रशंसनीय होती. आदिनाथ मंदिराच्या प्रत्येक धर्मकार्यामध्ये ते सतत योग देत असत. त्यांनी केशरिया येथें दवाखाना बांधविला असून शेडबाळ येथें मानस्तंभ निर्माण केला आहे. श्री महावीर ब्रह्मचर्याश्रम कारंजा या संस्थेस १००१) ची सहायता केली आणि श्री आचार्य शांतिसागर जिनवाणी जीर्णोद्धारक संस्थेस २१००) ची मदत करून स्थायीसदस्य झाले आहेत. याशिवाय इतर अनेक धर्मकार्यामध्ये यानी आपल्या संपत्तीचा विनियोग करून आदर्श निर्माण केला आहे.

सध्या श्री हिराचंद अमीचंद यांचे पुत्र चि. चंदुलाल हिराचंद शाह, जयकुमार हीराचंद शाह व मोतीलाल हीराचंद हे हयात आहेत. श्री माणिकचंद अमीचंद शाह, यांना एकुलते एक सुयोग्य पुत्र जंबूकुमार माणिकचंद शाह हे आहेत. उभय कुटुंबा-मध्ये पूर्ववत् स्नेहसंबंध कायम आहे. श्रीचंदुलाल हिराचंद आणि जंबूकुमार माणिकचंद हे सध्याचे कुटुंबकर्ते असून धर्मो-त्साही आहेत. दोघेही धार्मिक आणि सामाजिक कार्यामध्ये अत्यंत उत्साहाने भाग घेत असतात. गुरुभक्ति, सत्पात्र सेवा आदि कार्या-मध्ये आपल्या धर्मनिष्ठ मातुश्री व परिवाराच्या सहाय्याने सदा योग देत असतात. श्री जंबूकुमार हे हल्ली आदिनाथ मंदिर पंचा-यतीचे सेक्रेटरी असून शतसांवत्सरिक महोत्सवाचे ही ते सेक्रेटरी आहेत आणि विद्वत्परिषदेचे स्वागतमंत्री आहेत.

## श्रीसुवर्णकलशनिर्माण सं. १९२७

या नंतर श्रीआदिनाथ दिगंबर जैन मंदिराच्या दगडी मंडपा वरील घुमटावर सुवर्ण कलशाची स्थापना श्रीमूलप्रतिष्ठा-कार शेठ हरीभाई देवकरण यांनी केली. या बद्दल त्या कलशावर कोरलेल्या खालील लेखावरून माहिती उपलब्ध होत आहे.

## सुवर्णकलशलेख.

स्वस्ति श्री संवत् १९२७ फाल्गुण शुक्ल ११ एकादशी भृगुवासरे श्री मूलसंघे सरस्वतीगच्छे बलात्कारगणे श्री कुंदकुंदा-चार्यान्वये भट्टारक श्री सकलकीर्तिगुरूपदेशात् श्री सोलापूर नगरे श्री आदिनाथ चैत्यालये श्री अनंतनाथ व्रतोद्यापनमध्ये श्री मंडप उपरे दशाहुमड ज्ञातिय लघुशाखायां उत्तरेश्वरगोत्रे गांधी नाथा देवकरण भाईजण चार सुत रामचंद हरीचंद तत्पुत्र भाईचंद भाई (उर्फ रावसाहेब) वालचंद भाई, हीराचंद रामचंद गुजरात मध्ये गाम जादर दक्षिण मध्ये गाम सोलापूर श्री अनंत-नाथ चरणे नित्यं प्रणमंति। १।

## पंचमेरुप्रतिष्ठा सं. १९३०

या मंदिरामध्यें मंडपाचे उजवीकडे अढाई द्वीपाचें दर्शन पंचमेरूसह होत आहे. याची प्रतिष्ठा सं. १९३० मध्यें हेमचंद वालजी, श्री रामचंद्र व मलुकचंद हेमचंद व जेठीराम राम-चंद्र यांनी करून मोठी प्रभावना केली या वंशा संबंधीचा परिचय भुयारांतील प्रतिष्ठच्या उल्लेखामध्यें आम्ही यापूर्वी लिहिला आहे.

या पंचमेरू निर्माण संबंधी उल्लेख देवस्थानांतील खालील लेखामध्ये प्राप्त होत आहे.

## श्री आदिनाथ महाराज यांच्या मंदिरांत पंचमेरू अढाई द्वीपाचा नकाशा पितळेचा आहे; त्या वरील कोरलेला लेख.

संवत् १९३० मार्गशिर्ष कृष्णपक्षे ६ तिथौ बुधवासरे श्री-मूलसंघे सरस्वतीगच्छे बलात्कारगणे श्रीकुंदकुंदाचार्यान्वये भट्टारक श्रीसकलकीर्तिस्तत्पट्टे भट्टारकश्रीभुवनकीर्तिस्तत्पट्टे भट्टारकश्रीज्ञानभूषणतत्पट्टे भट्टारकश्रीविजयकीर्तिस्तत्पट्टे भट्टारकश्रीशुभचंद्रस्तत्पट्टे भट्टारकश्रीसुमतिकीर्तिस्तत्पट्टे भट्टारकश्रीगुणकीर्तिस्तत्पट्टे भट्टारक-श्रीवादिभूषणस्तत्पट्टे भट्टारकश्रीरामकीर्तिस्तत्पट्टे भट्टारकश्रीपद्मनंदि-स्तत्पट्टे भट्टारकश्रीदेवेंद्रकीर्तिस्तत्पट्टे भट्टारकश्रीक्षेमकीर्तिस्तत्पट्टे भट्टारकश्रीनरेंद्रकीर्तिस्तत्पट्टे भट्टारकश्रीविजयकीर्तिस्तत्पट्टे भट्टारक-श्रीनेमिचंद्रस्तत्पट्टे भट्टारकश्रीचंद्रकीर्तिस्तत्पट्टे भट्टारकश्रीरामकीर्ति-स्तत्पट्टे भट्टारकश्रीयशः कीर्तिस्तत्पट्टे भट्टारकश्रीसुरेंद्रकीर्तिस्तत्पट्टे भट्टारकश्रीरामकीर्तिगुरूपदेशात् गांधी हेमचंद दलजी भार्या झुमा एततुपुत्र उभय प्रथम पुत्र परमचंद भार्या उमा द्वितीय पुत्र रामचंद भार्या मेना एततुपुत्र जेठीराम रामचंद तृतीय पुत्र मलुकचंद हेमचंद भार्या झमकुदे हुंबड ज्ञातीय लघुशाखायां उत्तरेश्वर गोत्रे गुजरात मध्ये गाम टाका टूकाना रहिवाशी अत्र ग्राम सोलापुरना रहिवाशी स्वपुण्यार्थं अढाई द्वीप पंच मेरू समेत शुक्रवारपेठ मध्ये श्री आदिनाथ मंदिरे प्रतिष्ठितं । १ ।

## आळंदकर साकळा–परिवाराचें कार्य सं. १९४०

( १ ) शा. हेमचंद साकळा.–सं. १९४० मध्ये श्री आळंद निवासी श्री हेमचंद साकळा यांचे वंशज श्री माणिकचंद मोतीचंद आणि त्याचे बंधु अमीचंद मोतीचंद यांनी बरीच मोठी रकम खर्च करून श्रींचे मंदिरांतील सर्वांत पुढचा कलामय व मन-मोहक लाकडी मंडप बांधून दिला व मंदिराची शोभा वाढविली.

साकळा बंधूंनीं त्यावेळीं श्री आदिनाथ महाराज मंदिरावरील शिखरातील पांच मूर्ती धातूच्या बनवून देवळातील लाकडी मंडप निर्माण प्रीत्यर्थ बिंब प्रतिष्ठा केली. त्यापैकीं श्रीशांति जिनबिंब प्रतिष्ठा शा. हेमचंद साकळा यांनीं केली. त्याचा उल्लेख खालील प्रमाणे उपलब्ध आहे.

। मूल स्वामी ।

१ श्री शांतिनाथ चरणे प्रणमंति संवत् १९४० ना वर्षे मार्गशिर्ष मासे शुक्लपक्षे षष्ठ्यां ६ तिथौ बुधवासरे श्री मूलसंघे सरस्वती गच्छे बलात्कारगणे श्रीकुंदकुंदाचार्यान्वये भट्टारकश्रीसकल-कीर्तिस्तदनुक्रमेण भट्टारक २० वीस तत्पट्टे भट्टारकश्रीकनककीर्ति गुरोपदेशात् हुंबड ज्ञातीय लघुशाखाया खेर्जू गोत्र गुजरात मध्ये गाम गोरेल्ना शाहा हेमचंद साकळा भार्या खुशालबाई तत्पुत्र शाहा मोतीचंद तद्भार्या देवलबाई तत्पुत्र माणिकचंद तथा अमीचंदेन प्रतिष्ठितं. दक्षिणमध्ये गाम आळंद रहिवाशी.

शेठ माणिकचंद मोतीचंद आळंदकर हे हेमचंद साकळा या घराण्याचे उज्ज्वल दीपक होऊन गेले. त्यांनी आपल्या हयातीत

पुष्कळ दान धर्माचीं कार्यें केली आहेत. स्वयं ते व्रतनिष्ठ होते. सोलापुराशिवाय त्यांनी इतरत्र ही बरींच लोकोपयोगीं कार्यें केलीं आहेत. या परिवारांत सध्यां श्री हिराचंद माणिकचंद, श्रीफूलचंद माणिकचंद, श्री शिवलाल माणिकचंद आणि श्री नानचंद अमीचंद हे कर्तव्यनिष्ठ आहेत. लाकडी मंडपावरील कळश ध्वज यांचे कडूनच निर्मित आहे व यांचे कडूनच दरवर्षी या मंदिराचा ध्वज चढविला जात आहे.

( २ ) शा. परमचंद साकळा.–याच वेळीं आळंदकर परमचंद साकळा या घराण्यांतील श्री लीलाचंद आणि हीराचंद शाह यांनी शिखरावरील श्री चंद्रनाथ तीर्थंकरांची मूर्ति बसविली आणि प्रतिष्ठा केली. या वंशजामध्ये आळंद येथें सध्या श्री शेठ जीवराज हिराचंद शाह हे आहेत. श्री जीवराज हिराचंद शाह हे परम धार्मिक, सरल परिणामी असून सदा समाज आणि धर्म कार्यामध्यें योग देतात. सार्वजनिक कार्याची ही त्यांनां आवड आहे. निजाम स्टेटमधील अनेकक्षेत्र व संस्थेचे हे व्यवस्थापक आणि कुशल संचालक आहेत.

आपल्या पूर्वजांना साजेल आणि शोभेल याप्रमाणें त्यांची वृत्ति आहे त्यांचे मनवचन काय ह्या त्रिकरणामध्यें औदार्यपूर्ण प्रवृत्ति दृग्गोचर होत आहे.

यांच्या पूर्वजांनी चंद्रप्रभ स्वामीची प्रतिष्ठा केल्याबद्दल खालील प्रमाणें उल्लेख शिलालेखांत मिळत आहे.

## २ श्रीचंद्रनाथं नित्यं प्रणमंति ।

संवत १९४० ना वर्षे मार्गशीर्ष मासे शुक्ल पक्षे ६ षष्ठ्यां तिथौ बुधवासरे श्री मूलसंघे सरस्वतीगच्छे बलात्कारगणे श्रीकुंदकुंदाचार्यान्वये भट्टारक श्रीसकलकीर्तिदेवास्तदनुक्रमेण भट्टारक २० वीसस्तत्पट्टे भट्टारक श्री कनककीर्ति गुरूपदेशात् हुंबड ज्ञातीय लघुशाखायां उत्तरेश्वर गोत्रे गुजरात मध्ये गाम गोरेल शाहा परमचंद साकळा भार्या शेरबाई तत्पुत्र लीलाचंद तथा हीराचंद प्रतिष्ठितं । दक्षिणमध्ये गाम आळंद रहिवाशी. ।

(३) शा. सूरचंद साकळाः—याच प्रसंगी आळंद येथील सूरचंद साकळा आणि नानचंद सूरचंद, हीराचंद सूरचंद यांनीं शिखरांतील मंदिरामध्यें श्री आदिनाथ भगवंताची मूर्ति स्थापित करून प्रतिष्ठा केली. त्या संबंधी उल्लेख खालील प्रमाणें आहे.

## ३ श्रीआदिनाथ नित्यं प्रणमंति.

स्वस्तिश्री संवत् १९४० ना वर्षे मार्गशीर्ष मासे शुक्ल पक्षे षष्ठ्यां तिथौ बुधवासरे श्रीमूलसंघे सरस्वती गच्छे बलात्कारगणे श्रीकुंदकुंदाचार्यान्वये भट्टारक श्रीसकलकीर्तिस्तदनुक्रमेण भट्टारक २० तत्पट्टेभट्टारक श्रीकनककीर्ति गुरूपदेशात् हुंबड ज्ञातीय लघुशाखायां उत्तरेश्वर गोत्रे गुजरात मध्ये गाम गोरेलना शाहा सूरचंद साकळा तद्भार्या रतनबाई तथा गंगाबाई तत्पुत्र नानचंद तथा हिराचंदेन प्रतिष्ठितं. दक्षिण मध्यें गाम आळंदरहिवाशी.

या वंशामध्यें सध्यां श्री मोतीचंद जीवराज, वालचंद जीवराज; रतनचंद गौतमचंद, चंदुलाल गौतमचंद, कांतीलाल गौतमचंद, मोहनलाल गौतमचंद हे सर्व कर्तव्यनिष्ठ आहेत.

(४) शा. अमोलिख साकळा—याच वेळी आळंदकर श्री अमोलिख साकळा यांचे वंशज श्री गुलाबचंद, व माणिकचंद व मोतीचंद या बंधुत्रयांनी शिखरांतील मंदिरात श्री अनंतनाथ भगवंताची मूर्ति स्थापन करून आपली अर्हद्‌भक्ति व्यक्त केली त्याचा उल्लेख खालील प्रमाणें आहे.

## ४ श्रीअनंतनाथं नित्यं प्रणमंति

स्वस्तिश्री संवत् १९४० ना वर्षे मार्गशिर्षमासे शुक्लपक्षे षष्ठ्या ६ तिथौ बुधवासरे श्रीमूलसंघे सरस्वतीगच्छे बलात्कारगणे श्रीकुंदकुंदाचार्यान्वये भट्टारक श्री सकलकीर्ति स्तदनुक्रमेण भट्टारक २० वीस तत्पट्टे भट्टारकश्रीकनककीर्ति गुरूपदेशात् हुंबडज्ञातौ लघुशाखायां उत्तरेश्वर गोत्रे गुजराथ मध्ये गाम गोरेल शाहा अमोलिख साकळा भार्या ज्ञानबाई तत्पुत्र गुलाबचंद तथा माणिकचंद तथा मोतीचंद प्रतिष्ठितं दक्षिणमध्ये गाम आळंदना रहिवाशी.

या वंशामध्ये सध्यां श्री रतनचंद माणिकचंद, हीराचंद रामचंद माणिकचंद, गौतमचंद गुलाबचंद, हीराचंद गुलाबचंद व जिवराज गुलाबचंद हे कर्तव्यनिष्ठ पुरुष आहेत.

(५) शा. देवचंद साकळा—याच वेळीं आळंदनिवासी शा. देवचंद साकळा याचे वंशज श्री अमीचंद यांनी श्री शिखरांतील मंदिरामध्यें अंतिम तीर्थंकर श्रीमहावीर यांची मूर्ति स्थापित करून प्रतिष्ठा केली. त्याचा उल्लेख खालील प्रमाणें आहे.

## ५श्रीवर्द्धमानचरणे नित्यं प्रणमन्ति

स्वस्तिश्री संवत् १२४० ना वर्षे मार्गशीर्षमासे शुक्लपक्षे षष्ठयां ६ तिथौ बुधवासरे श्रीमूलसंघे सरस्वतीगच्छे बलात्कारगणे श्रीकुंदकुंदाचार्यान्वये भट्टारकश्रीसकलकीर्तिस्तदनुक्रमेण भट्टारक श्रीकनककीर्तिगुरूपदेशात् हुंबडज्ञातौ लघुशाखायां उत्तरेश्वर-गोत्रे गुजरातमध्ये गाम गोरेलना शा देवचंद साकळा भार्या वालुबाई तथा केशरबाई तत्पुत्र अमीचंदेन प्रतिष्ठितं. । दक्षिण-मध्ये गाम आळदंना रहिवाशी. ।

या वंशांत सध्यां श्रीहीराचंद अमीचंद, माणिकचंद अमी-चंद आणि चंदुलाल अमीचंद हे कर्तव्यनिष्ठ पुरुष आहेत.

या प्रमाणें आळंद निवासी साकळा–सहोदर वंशजांनीं या देवस्थानांतील लाकडीं मंडप आणि शिखरावरील पंचमूर्तिची प्रतिष्ठा करून या धर्मायतनाच्या वृद्धी मध्यें भर घातली आहे. हा साकळा परिवार गुजराथ मधील गोरेल ग्रामामधून व्यापारा-निमित्त आळंदला आला होता. आणि आळंद येथें ही या परिवाराचें प्रभुत्व असून धर्मकार्यामध्यें विशिष्ट सहयोग या परिवारामधून मिळत आहे.

सोलापूरचे मंदिरांत आळंदकर मंडळींनीं प्रतिष्ठा करविली व मंदिराच्या वाढीमध्यें जें सहाय्य केलें, त्यावरून त्यावेळीं गुजरात-मधून दक्षिणेत आलेला हुमड समाज कसा एकोप्याने व गुण्या-गोविंदानें राहात होता हें सहज दिसून येईल. त्यावेळचा समाज

भद्रपरिणामी, सुरस्वभावी, चारित्रवान, धार्मिक व न्यायप्रवृत्तीच होता याचे एक उदाहरण म्हणजे त्यावेळच्या पंचायतीच्या आदर्श व्यवस्थेचा उल्लेख करणें उचित होईल.

## दक्षिणेतील तत्कालीन दशाहुमड पंचायतीची आदर्श व्यवस्था.

४०।५० वर्षांपूर्वी दशाहुंमड जैन पंचायतीचे साडे सहा परगणे ( विभाग ) व कांहीं तुकड्या होत्या. तुकडीमध्ये साधारणतः १०।१२ गांवची व्यवस्था पाहण्याचा हक्क त्या पैकीच एका गांवाकडे असे व परगण्यामध्यें २५।३० गावांची व्यवस्था असून ज्या गावचा परगणा ( टप्पा ) असेल त्या गांवच्या शेठ कडे त्या परगण्याची व्यवस्था पाहण्याचा अधिकार असे. कुंभारी टप्यांतून सोलापूरचा एक स्वतंत्र सुभा ( संभा ) निर्माण झाला होता

साडे सहा टप्यावर माढें हें न्यायदानाचें व मुख्य अधिकाराचें ठिकाण होतें. कोणत्याही टप्याचा निकाल योग्य न वाटल्यास माढें इथें दाद मागितली जाई व तेथें सर्व टप्यांचे व तुकड्यांचे प्रतिनिधी जमून मोठी सभा भरवून त्या ठिकाणीं शेवटचा निर्णय घेतला जाई व तो निर्णय माढें येथील मुख्य न्याय पंच मोदी घराण्यांतील प्रमुख पुरुषाकडून देण्यांत येई व तो सर्वांना बंधनकारक असे. निर्णयानुसार अथवा शिस्तभंगाबद्दल बऱ्याच जणांना कडक शिक्षा व दंड ठोठावला जात असे.

दशाहुंमड समाजाच्या अत्यंत भरभराटीच्या वेळीं वरील प्रमाणें आदर्श, अनुकरणीय व सर्वांवर बंधनकारक अशी व्यवस्था होती. परंतु अलीकडे ही व्यवस्था नष्ट झाली आहे असें मोठ्या खेदानें नमूद करावें लागत आहे.

## श्री अनतंनाथ प्रतिष्ठा सं. १९५९

सं. १९५९ मध्यें श्रींचे मंदिरातील मागील बाजूचे श्री. अनंतनाथ भगवानांची प्रतिष्ठा श्री. रावजी नानचंद गांधी यांनीं केली.

याबद्दल खालील प्रमाणें उल्लेख आहे.

१ स्वस्तिश्री संवत् १९५९ शके १८२५ ज्येष्ठमासे शुक्लपक्षे नवम्यां तिथौ गुरुवासरे श्रीमूलसंघे सरस्वतीगच्छे बलात्कारगणे श्रीकुंदकुंदाचार्यान्वयभट्टारकश्रीसकलकीर्तिस्तदनुक्रमेण भट्टारकश्रीकनककीर्तिगुरूप देशात् हुंबडज्ञातौ लघुशाखायां बिल्लेश्वरगोत्रोत्पन्नेन गांधी रावजी नानचंद इत्यनेन श्रीअनंत जिनस्येदं बिंबं प्रतिष्ठितं । १ ।

श्री शेठ रावजी नानचंद गांधी सोलापुरांतील एक प्रसिद्ध धर्मात्मा होते. त्यानी आदिनाथ मंदिरांत अनंतनाथ भगवंताची प्रतिष्ठा केली. या शिवाय त्याच वेळीं श्वेतवर्ण घोड्याचा चांदीचा कलापूर्ण रथ करवून मंदिरास अर्पण केला. आणि या कामीं त्यांनीं २५ हजार रुपये खर्च केला. आणि त्याचवेळीं चांदीचा पंचमेरु तयार करवून दिला. या शिवाय त्यांनीं कुंथलगिरी, गजपंथ, पालीठाणा, वगैरे तीर्थक्षेत्रांवर बराचसा दान धर्म केला आहे.

शेठ रावजीभाई नानचंद गांधी यांच्या वंशामध्यें हल्ली १ श्री प्रेमचंद रावजी गांधी, २ चद्रकांत प्रेमचंद, ३ सुर्यकांत प्रेमचंद, ४ कस्तुरचंद मोतीचंद, ५ पोपटलाल मोतीचंद ६ रतीलाल मोतीचंद, हे आहेत.

## सहस्त्रकूट जिनमंदिर संवत् १९६१

सं. १९६१ मध्यें श्रीचे मंदिरांतील उजवीकडे असलेले संगमरमरी श्री सहस्त्रकूट जिनमंदिराची प्रतिष्ठा श्री. रावजी कस्तूरचंद यांनी केली. यांचे वंशांत हल्लीं माणिकचंद रामचंद, जयकुमार माणिकचंद, विजयकुमार माणिकचंद, हे हयात आहेत. यांनीं सोलापुरांत वरील सहस्त्रकूट जिनमंदिर बांधून दिलें आहे. या शिवाय पालीठाणा येथें एक जिनमंदिर बांधून प्रतिष्ठा केली आहे. सहस्त्रकूटाचे निर्माण संबंधी उल्लेख खालील प्रमाणें आहेत.

१ स्वस्तिश्री संवत् १९६१ मासोत्तममासे ज्येष्ठमासे शुक्ल पक्षे ९ नवम्यां तिथौ रविवासरे श्रीमूलसंघे सरस्वतीगच्छे बलात्कारगणे श्रीकुंदकुंदाचार्यान्वयभट्टारकश्रीसकलकीर्तिस्तदनुक्रमेण भट्टारकश्रीकनककीर्तिगुरूपदेशात् दशाहुंबडज्ञातौ लघुशाखायां अंबेश्वरगोत्रोत्पन्न शाहा परमचंद तत्पुत्र मोतीचंद तत्पुत्र कस्तूरचंद तद्भार्या रतनबाई तत्पुत्र रावजी, फूलचंद, हीराचंदास्तेषां क्रमेण भार्याभिः सखूबाई, चतुरबाई, जमनाबाईति नामिकाभिश्च रावजी तत्पुत्रो रामचंद्रस्तदेतस्य भार्या केशरबाई तस्याः पुत्रेण माणिकचंद्रेण षोडशपुरे सहस्त्रकूटजिनबिंबं प्रतिष्ठापितम् ।

२ या सहस्रकूट मंदिरावरील गुमटी वरील जो सुवर्णमय कळश चढविला गेला त्या कळशावर वरील प्रमाणे लेख कोरलेला आहे. मंदिरांतील मूलनायक श्रीवृषभदेवाची प्रतिष्ठा झाल्या नंतर ५६ वर्षांनीं हा धार्मिक महोत्सव झाला.

या शिवाय खालील धर्मप्रेमी लोकांनीं वेळोवेळीं जिनमंदिराच्या वाढीकरितां बरीच सहाय्यता केली आहे.

संवत् १९८१ मध्यें श्रीचें मंदिरांतील लाकडी मंडपांतील फरशीचें काम येथील सुप्रसिद्ध धर्मनिष्ठ शेठ सखाराम नेमचंद दोशी यांनीं करविलें. श्रीसखाराम नेमचंद दोशी सोलापुरांतील प्रतिष्ठित व धर्मात्मा होते. त्यांनी बरेच दानधर्माचें कार्य केलें आहे. त्यांच्या स्मृतिरूप येथें श्रीसखाराम नेमचंद औषधालय, सखाराम नेमचंद नेत्र चिकित्सालय वगैरे संस्था आहेत. याशिवाय त्यांनीं साहित्य-प्रकाशन, मंदिर निर्माण, आदि लोकोपयोगी कार्यांमध्ये वेळोवेळीं मदत केली आहे. येथील समाजमध्यें त्यांची आदरानें गणना होत होती. त्यांना सर्व नागरिक ' बाबा ' या आदरार्थी शब्दानें ओळखीत असत. या मंदिराच्या वृद्धीमध्ये त्यांनीं बराच योग दिला आहे.

संवत् १९८२ मध्यें मंदिरांतील इलेक्ट्रीक फिटींग करित श्री गुलाबचंद फुलचंद करकंबकर, श्री गुलाबचंद हिराचंद टाकळकर व श्री वालचंद हिराचंद मंगरूळकर यांनीं ५०१ रु. ची मदत केली.

संवत् १९८७ मध्यें येथील प्रसिद्ध शेठ हिराचंद नेमचंद दोशी यांनी मंदिरावरील जीर्णोद्धार व रंगकाम सुमारे ८०००

हजार रुपये खर्च करून केले. श्री शेठ हिराचंद नेमचंद दोशी सोलापुरांतील प्रथितयश आणि कर्मनिष्ठ सज्जन होते. त्यांनीं धार्मिक आणि सामाजिक कार्याशिवाय सार्वजनिक कार्यामध्ये ही विपुल संपत्तीचा व्यय केला आहे. अनेक संस्थांचे ते संचालक होते. ऐ. प. पाठशाला, जैन बोर्डिंग, पांजरापोळ, आदि अनेक संस्थांचे ते व्यवस्थापक होते. त्यांनीं राजुबाई प्रसूतिका गृह, सेवासदन, धर्मशाला, रुग्णनिवास, आणि जनरल लायब्रेरी आदि लोकोपयोगी कार्यांच्या चिरस्थायित्वाकरितां इमारती बांधून दिल्या. ते जैनबोधक पत्राचे संस्थापक व संचालक होते. त्यांचे पुत्र आज श्री शेठ वालचंद, हिराचंद. सेठ गुलाबचंद हिराचंद, शेठ रतनचंद हिराचंद आणि शेठ लालचंद हिराचंद आहेत. सर्व सहोदर सुशिक्षित, कर्तव्यदक्ष, उद्योगशील आणि कुशल आहेत. श्री शेठ वालचंद हिराचंद दोशी हे औद्योगिक जगामध्ये आंतरराष्ट्रीय ख्यातिप्राप्त साहसी आणि उद्यमी आहेत.

श्रींचे मंदिरांतील मागील बाजूस असलेली श्री बाहुबली स्वामींची प्रतिष्ठा जोतीचंद प्रेमचंद यांनीं केली.

श्रींचे मंदिरांतील मूलनायकांची चांदीची प्रभावळी माणिकबाई गंगाराम शहा यांनीं करविली व तेथील इलेक्ट्रीकचे काम सुद्धां त्यांनींच केले आहे.

मूल नायकांचे उजवे बाजूची चांदीची प्रभावळ ब्र. रखमाबाई नानचंद यांनीं व डावे बाजूची चांदीची प्रभावळ श्रीमती मैनाबाई तारापूरकर यांनीं केली.

श्रींचे गाभाऱ्याचा चांदीचा भव्य दरवाजा आहे.

## मानस्तंभनिर्माण

संवत् १९९४ मध्ये श्रींचे मंदिरांतील मागील बाजूस असलेले अनंतनाथ स्वामींचे मंदिरासमोर संगमरवरी पाषाणाच्या मानस्तंभाची निर्मिति श्रीमती फुलबाई लिंबरगीकर यांनीं करवून प्रतिष्ठा करविली त्या बद्दल खालील प्रमाणे उल्लेख आहे.

## मानस्तंभलेख.

१ श्रीचतुर्मुखपार्श्वजिनाय नमः ।

स्वस्तिश्री संवत् १८९४ मिति ज्येष्ठ शुक्ल ४ गुरुवार श्री मूलसंघे सरस्वती गच्छे बलात्कारगणे श्रीकुंदकुंदाचार्यान्वये भट्टारक श्रीसकलकीर्तिगुरूपदेशात् लिंबरगीनिवासी खेरजू गोत्रातील शाहा वीरचंद रामचंद यांचे पुत्र जीवराजचंद, कस्तूरचंद, नथूचंद. शिवलालचंद यांच्या पैकी जिवराजचंद यांची भार्या फुलबाई यांनीं आपल्या व स्वर्गीय भ्रतार यांच्या धर्मादाय रकमेपैकी रुपये २००१ दोन हजार एकवा हा मानस्तंभ सोलापूर शुक्रवार पेठेंतील श्री आदिनाथ महाराज यांच्या मंदिरांत उभारून त्यावर चतुर्मुख श्री पार्श्वजिनबिंब फुलबाई व पुत्र हिरालाल यांनीं पंचकल्याणिक पूर्वक प्रतिष्ठापित केलें असें वीराब्द २४६४ इति शुभं । १ ।

या प्रमाणें अनेक धर्माला श्रावकांनी या देवस्थान संस्थानच्या वाढी करितां आपले समय आणि व्यय खर्ची घातले. त्या योगें आज सोलापुर येथें एक भव्य आणि विशाल जिनमंदिर आपणांस पाहणेस मिळत आहे. या पद्धतीचा कलामय मंदिर आज कोठेंही दिसत नांहीं.

## दि. जैन धर्मशाळा निर्माण सं. १९८९

श्री आदिनाथ जिनमंदिराच्या पाठीमागे एक धर्मशाळा पूर्वी होती. परंतु सोलापुर येथें येणाऱ्या यात्रेकरूकरितां ती अपुरी पडत होती सोलापुर हे मध्यवर्तिस्थानामध्ये असल्यामुळें कुंथलगिरी, जैनबिद्री, मूडबिद्री वगैरे ठिकाणीं जाणारे यात्रेकरू लोक सोलापुरास येऊनच जातात. अशा स्थितीमध्ये येथें एक विशाल धर्मशाळेची आवश्यकता होती. श्री धर्मवीर सेठ रावजी सखाराम दोशी यांनी हें काम मनावर घेतलें. आणि त्यांनी सं. १९८९ मध्यें धर्मशाळेचें काम श्री सेठ रावजी पानाचंद गांधी आदिच्या सहयोगानें अत्यंत उत्साहानें केलें आणि सुमारे २० हजार रूपये स्वतःच्या पदरचे खर्च करून धर्मशाळेचे भव्य इमारतीचें बांधकाम करविले आणि नंतर दातारांकडून या कामाकरितां मदत मिळवून पूर्ति केली.

श्री धर्मवीर रावजी सखाराम दोशी हे भारतवर्षामध्ये सर्वत्र सुपरिचित आहेत. ते सरल नि शांत परिणामी, साहित्यसेवक आणि परमगुरुभक्त होते. ते अनेक संस्थांचे संचालक होते. ऐ. प. पाठशाळा, जैनबोर्डिंग, सोलापुर, पांजरापोळ, माणिकचंद परीक्षालय, इत्यादि अनेक संस्थांचे व्यवस्थापक होते. त्यांनी अनेक साहित्यांचे प्रकाशन केले असून आजीवन धर्मसेवा केली आहे. आदिनाथ मंदिराच्या विविध प्रवृत्तीमधे ते सदा योग देत असत. आणि देवस्थान संस्थानाच्या वाढीमध्ये ही त्यांनी बरीच मदत केली. आहे. त्यांचे पश्चात् शेठ गोविंदजी रावजी दोशी हे कर्तव्यनिष्ठ सज्जन आहेत.

